# आपलें बोलणें

## पुस्तक ३ रें

[ मराठी सहावी व इंग्रजी दुसरी ह्यांकरिता ]

( सुधारून वाढविलेली आवृत्ति तिसरी )

लेखक—मोरेश्वर सखाराम मोने
( अध्यापक, 'अध्यापिकाशाला,' हिंगणें, पुणें )

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,
हॉर्नबी रोड, कोट, मुंबई

 १९३२ [ किंमत ५ आणे

# प्रस्तावना

माझ्या पहिल्या व दुसऱ्या पुस्तकाप्रमाणेंच हें तिसरें पुस्तकही रा० रा० **महादेव काशीनाथ कारखानीस** बी० ए० ( प्रिन्सिपल–ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, धुळें ) आणि रा० रा० **गोविंद बळवंत मोकाशी** ( शिक्षक–ट्रेनिंग कॉलेज फॉर वुइमेन, पुणें ) ह्या उभयताच्या देखरेखीखालीं तयार केलें आहे; एवढे लिहिलें म्हणजे पुरे असें वाटतें. त्यांचे आतां आभार मानण्यात केवळ औपचारिकपणाच उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळें, त्या भानगडीत मी पडत नाहीं.

हीं पुस्तकें लिहितांना सरकारने नेमलेल्या व्याकरण कमिटीचा कोर्स पुढे ठेवूनच जरी तीं लिहावीं लागलीं, तरी दोन गोष्टींकरितां मी मुद्दाम परिश्रम घेतले आहेत, हें सुज्ञांच्या ध्यानी येईल. एक–व्याकरणशास्त्र व कोर्स याची घडी शक्य तेवढी व्यवस्थित जुळवावयाची; आणि दुसरी–शिक्षणशास्त्रास अनुसरून पृथक्करण, स्वयंशोधन व पायरीपायरीनें ध्येय गांठणें, या अध्यापन-पद्धतींचा प्रत्येक पाठाकरितां भरपूर उपयोग करावयाचा; या दोन गोष्टी मी वर लिहिल्याप्रमाणें प्रि० **कारखानीस** व रा० **मोकाशी** यांचे मुक्तहस्त साह्यानें साधिल्या आहेत. तज्ज्ञानी माझ्या या कृतीचा योग्य तो परामर्श घ्यावा, एवढेंच त्यांजपाशीं माझें मागणे आहे.

ह्या **तिसऱ्या** आवृत्तींत टेक्स्ट् बुक कमिटीच्या शिफारशीप्रमाणें **प्रि० सीताराम रामजी तावडे** ह्यानीं प्रेमभावाने ज्या सुधारणा सुचविल्या, त्या सर्व अमलांत आणिल्या आहेत. त्यांच्या ह्या उपकृतीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

तसेंच टेक्स्ट् बुक कमिटीनें वाक्यपृथक्करणाचा जो आराखडा सुचविला आहे, त्याप्रमाणेंच ह्या पुस्तकांत घातला आहे.

" अध्यापिकाशाला "
हिंगणें, पुणें

आपला नम्र,
**मोरेश्वर सखाराम मोने**

# अनुक्रमणिका

# आपलें बोलणें

## पुस्तक तिसरें

[ सहाव्या इयत्तेकरितां ]

## १. धातुसाधित नामें

[ १ ]

खालील मोठ्या अक्षरांतील शब्दांचें नीट निरीक्षण करा बरें ! त्यांत काय फरक आहे ?

| क | ख |
|---|---|
| १. गंगू **बोलते** | १. गंगूचें **बोलणें** |
| २. गंगू **बोलली** | २. बोबडें **बोलणारी** गंगू |
| ३. गंगू **बोलेल** | ३. गंगूला **बोलतांना** |
| ४. गंगूनें **बोलावें** | ४. गंगू **बोलून** |

ह्यांतील मोठ्या अक्षरांचे शब्द **क्रिया** दाखविणारे आहेत, व ते वाक्याचा अर्थ पुरा करणारे आहेत, म्हणून ते **क्रियापदें आहेत**; हें उघडच आहे.

ह्यांतील मोठ्या अक्षरांचे शब्द **क्रिया** दाखविणारेच आहेत, पण त्यांना क्रियापदें म्हणतां येईल काय ? त्यांच्या योगानें वाक्याचा अर्थ पुरा होत नाहीं, म्हणून ते **क्रियापदें नाहींत.** यांना **धातुसाधित शब्द** म्हणतात.

[ २ ]

वरीलपैकीं **धातुसाधित शब्दांचा** आपण आतां ज्यास्त विचार करूं या. त्यांचा वाक्यांत कोणाशीं संबंध असतो ? ते काय काम करितात बरें ?

मागे नामाबद्दल विचार करितांना आपण पाहिलेंच आहे कीं:—

**बोलणें**—एका क्रियेचे नांव आहे.
**पिणें**—हेही क्रियेचें नाव आहे.
**पाजणें**—क्रियेचेच नांव आहे.

**वटारणें**—क्रियेचे नाव आहे.
**उगवणें**—हेही त्या क्रियेचेंच नांव आहे.

ह्याप्रमाणेच **देणें, घेणें, खाणें, बसणें, नसणें,** हे शब्द त्या त्या क्रियांचीं नावे आहेत. हे आपल्यास पूर्वींच माहीत झालें आहे. म्हणजे 'बोल' हा क्रिया दाखविणारा मूळ शब्द व त्यापासून **बोलणें** हें नाम झालें 'पी' हा क्रिया दाखविणारा मूळ शब्द व त्यापासून **पिणें** हें नाम झाले. तसेच पाज, वटार, उगव, हे क्रिया दाखविणारे मूळ शब्द व त्यांपासून **पाजणें, वटारणें, उगवणें,**

हीं अनुक्रमें नामें झालीं. ह्याप्रमाणें क्रिया दाखविणाऱ्या मूळ शब्दांपासून त्या त्या क्रियांचीं नांवें दाखविणारे शब्द **म्हणजे** "क्रियांचीं नामें" बनतात; असें झालें.

या शब्दांतील क्रिया दाखविणारे हे जे **मूळचे शब्द** त्यांना "**धातु**" असें नांव आहे; व त्या मूळ शब्दांपासून म्हणजे "**धातूं**"पासून वरचीं नामें बनलीं आहेत; म्हणून त्यांना धातूंवरून साधलेलीं म्हणजे "**धातुसाधित नामें**" असें म्हणतात.

म्हणजे मूळ क्रिया-शब्दांपासून किंवा धातूंपासून "**धातुसाधित नामें**" बनतात; हें आपल्यास आढळून आलें.

१. आज मुलांना शाळेत फार **मार** बसला.
२. पावसानें आज फार **झोड** उडविली आहे.
३. मी चक्कीवर **दळण** नेत आहें.
४. पोह्यांचें **कांडण** कठीण असते.
५. काचेच्या सामानाची **फूट** झाल्यामुळें आम्हांस **तूट** सोसावी लागली.

यांत **मार, झोड, दळण, कांडण, फूट** व **तूट** ह्या शब्दांचा नामांप्रमाणे उपयोग केला आहे; आणि हे शब्द धातूंवरून साधले असल्यामुळें, तेही **धातुसाधित नामेंच** आहेत, हें सहज ध्यानांत येईल.

   

एवढ्या विचारावरून आपणांस काय समजलें ?

**१. धातूवरून (१) क्रियापदें व (२) धातुसाधितें, असे दोन प्रकारचे शब्द बनतात.**

**२. धातुसाधित शब्दांत कांहीं शब्द "धातुसाधित नामें" असतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **करणें, बोलणें, देव, घेव, जळण, तळण,** अशा प्रकारची "**धातुसाधित नामें**" वाक्यात योजून दहा वाक्यें लिहून आणा.

२. खालील वाक्यांतील "**धातुसाधित नामें**" कोणती तीं सांगाः—

( १ ) उपजणें व मरणें हें मनुष्याला चुकत नाही. ( २ ) इमारती बांधणे व खोदकाम करणें ह्या कला पूर्वींच हिंदुस्थानांत होत्या. ( ३ ) आता शिकण्याकडे पुष्कळाचा कल आहे. ( ४ ) खेळण्यानें शरीरास व्यायाम घडतो. ( ५ ) तो खोटें बोलण्याचें नीच काम कधींही करीत नाही. ( ६ ) कृष्णा लांकडें आणण्यासाठीं रानात गेला. ( ७ ) देवाची करुणा भाकणे हें आपलें पहिलें कर्तव्य होय. ( ८ ) उशिरां उठण्यानें शाळेस जाण्याची धांदल होईल. ( ९ ) पुस्तकांत पाहून उदाहरण करणें म्हणजे गुरुजींना फसविण्यासारखेंच होय. ( १० ) तसें वागण्याचा मोह टाळला पाहिजे. ( ११ ) तुझी नेहमी अशीच रड असायची. ( १२ ) माझें गोविंदाशी भांडण झाले. ( १३ ) शत्रूचा पुरा मोड झाला. ( १४ ) पावसानें झोड उडविली.

---

# २. धातुसाधित विशेषणें व अव्ययें

## [ १ ]

खालील वाक्यें पहाः—

( १ ) पक्ष्यानें **खाल्लेलें** फळ गोड असतें.

( १ ) **चावणारा** कुत्रा बांधूनच ठेवावा.

| | |
|---|---|
| ( २ ) काल **पाहिलेला** मनुष्य हाच | ( २ ) **लंगडणारी** घोडी टांग्याला कशाला जुंपतोस ? |
| ( ३ ) **हरवलेली** अंगठी मला सांपडली. | ( ३ ) **रडणारें** मूल कोणालाच आवडत नाहीं. |

ह्या ठिकाणीं **खाल्लेलें** हा शब्द 'खा' ह्या मूळ धातूपासून झाला आहे; **पाहिलेला** हा शब्द 'पाह' ह्या मूळ धातूपासून झालेला आहे; त्याचप्रमाणें **हरवलेली** हा शब्द 'हरव' ह्या मूळ धातूपासून झाला आहे. दुसरीकडच्या वाक्यांतही **चावणारा, लंगडणारी** व **रडणारें** हे शब्द 'चाव,' 'लंगड' व 'रड' ह्या मूळ धातूंपासून बनलेले आहेत, हें उघडच आहे. हे शब्द वाक्यांत काय काम करितात बरें ?

असें दिसतें कीं:—

(१) **खाल्लेलें** फळ
(२) **पाहिलेला** मनुष्य
(३) **हरवलेली** अंगठी

} यांत फळ **कसें**, मनुष्य **कोणता**, अंगठी **कोणती**, हें 'खाल्लेलें,' 'पाहिलेला' व 'हरवलेली' ह्या शब्दांवरून कळत आहे.

त्याचप्रमाणें—

(१) **चावणारा** कुत्रा
(२) **लंगडणारी** घोडी
(३) **रडणारें** मूल

} ह्यांत कुत्रा **कोणता**, घोडी **कशी**, मूल **कोणतें**, हें 'चावणारा,' 'लंगडणारी' व 'रडणारें' ह्या शब्दांवरून कळत आहे.

ह्यावरून खाल्लेलें, पाहिलेला, हरवलेली; व चावणारा, लंगडणारी,

रडणारें; हे किंवा यांसारखे शब्द नामांचा गुण दाखविणारे म्हणजे **विशेषणें** आहेत, हें उघडच झालें.

तेव्हां मूळ धातूवरून विशेषणेंही बनतात; असें दिसून आलें. त्यांना आपण “ **धातुसाधित विशेषणें** ” असें म्हणूं.

वरीलप्रमाणेंच—

१. माझें **राहतें** घर सदाशिव पेठेत आहे.
२. गंगूची **आवडती** बाहुली हरवून गेली.
३. वाघाला **पाळता** हात व **मारता** हात दोन्ही सारखींच.
४. **गेलें** वर्ष, त्यांतही **गेला** दिवस व **गेली** रात्र, ही फारच मजेत गेलीं.

ह्या ठिकाणीं **राहतें, आवडती, पाळता, मारता, गेलें–गेला–गेली,** हे शब्द धातूंवरून झालेले असून, ते पुढील शब्दांचा गुण दाखवीत असल्यामुळे तेही **धातुसाधित विशेषणें** आहेत; हें उघडच आहे.

[ २ ]

आतां खालील वाक्यांतील मोठ्या अक्षरांतील शब्द पहा:—

( १ ) आपण **येतां, जातां,** देवाचें नांव घ्यावें.

( २ ) तो मुलगा **बोलतांना,** अडखळतो.

( १ ) भिमी खूप **चालून,** दमली.

( २ ) मीं झाडावर **चढून,** हे आंबे काढिले.

( १ ) आज हा मुलगा **रडत,** शाळेंत आला. ( २ ) तो पुस्तक **वाचीत,** अंथरुणावर पडला आहे.

ह्या ठिकाणींही **येतां, जातां, बोलतांना; चालून, चढून; रडत** व **वाचीत;** हे शब्द अनुक्रमें 'ये,' 'जा,' 'बोल,' 'चाल,' 'चढ,' 'रड,' व 'वाच,' ह्या मूळ धातूंपासून झाले आहेत; हें उघडच आहे.

हे शब्द वाक्यांत काय काम करितात बरें ? पहा:—

| | | |
|---|---|---|
| १. आपण देवाचें नांव **घ्यावें**........ | केव्हां ? | **येतां, जातां.** |
| २. तो **अडखळतो**................ | केव्हां ? | **बोलतांना.** |
| १. भिमी **दमली**................... | कशी ? | **चालून.** |
| २. मीं आंबे **काढिले**............... | कसे ? | **चढून.** |
| १. मुलगा शाळेत **आला**............ | कसा ? | **रडत.** |
| २. तो अंथरुणावर **पडला आहे**.... | कसा ? | **वाचीत.** |

ह्याप्रमाणें ह्या वरच्या वाक्यांतले येतां, जातां, बोलतांना; चालून, चढून; व रडत, वाचीत; हे शब्द क्रियांचा गुण दाखविणारे म्हणजे **क्रियाविशेषण अव्ययें** आहेत, हें उघडच झालें; आणि हे शब्दही धातूंवरूनच साधलेले म्हणजे बनलेले असल्यामुळें, त्यांना "**धातुसाधित अव्ययें**" असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं.

\+ \+ \+ \+

एवढ्या विचारावरून आपल्यास काय समजलें ?

**१. धातुसाधित शब्द तीन प्रकारचे असतात. (१) धातुसाधित नामें, (२) धातुसाधित विशेषणें व (३) धातुसाधित अव्ययें.**

## प्रश्न व गृहपाठ

१. क्रिया दाखविणारे शब्द किती प्रकारचे असतात ? कोणते ?

२. करून, जाऊन; करणारा, देणारा; बसणें, उठणें; दिलेलें, घेतलेलें; हंसत, रडत; हे कोणत्या प्रकारचे धातुसाधित शब्द आहेत ?

३. **धातुसाधित नामें, विशेषणें** व **अव्ययें** वाक्यांत योजून, १० **वाक्यें बनवा.**

४. खालील वाक्यांतील **धातुसाधित नामें, विशेषणें** व **अव्ययें** ओळखाः—

( १ ) मिराबाई वृंदावनाहून निघून द्वारकेस गेली. ( २ ) गप्पा मारण्यांत आम्ही दिवस घालविला. ( ३ ) तो मित्रास बरोबर घेऊन, काशीस गेला. ( ४ ) मोठ्यानें ओरडून त्याचा आवाज बसला. ( ५ ) मी तुला उद्यां खचित भेटण्यास येईन. ( ६ ) पोहतांना हात-पाय हालवावे लागतात. ( ७ ) गोविंदराव सदूस पाहून फार रागावले. ( ८ ) पोपट हा बोलणारा पक्षी आहे. ( ९ ) आकाशांत लुकलुकणारे गोल तेच तारे होत. ( १० ) बोबडें बोलणारा मुलगा मला आवडत नाहीं. ( ११ ) तो पहा पिकलेला आंबा. ( १२ ) तें धुतलेलें धोतर घेऊन ये. ( १३ ) गंगू पाय आपटीत माडीवर गेली. ( १४ ) मी पोहत खाडीपलीकडे जाईन. ( १५ ) रांगतें मूल सर्वास आवडतें. ( १६ ) गेली वेळ पुन्हां येत नाहीं. ( १७ ) तो करता-सवरता मुलगा आहे. ( १८ ) दशरथाची आवडती बायको कैकेयी होती. ( १९ ) पाहिला जिन्नस मागत सुटतो. ( २० ) उरलें-सुरलें अन्न भिकारणीला घाल. ( २१ ) परानें दिधलें दुःख सोसावें. ( २२ ) भस्मानें उटिला आरसा तेंवि सत्संगें हृदय स्वच्छ होतें.

# ३. सहाय व संयुक्त क्रियापदें

[ १ ]

खालील वाक्यांत कोणत्या प्रकारचा फरक किंवा सारखेपणा आढळून येत आहे बरें ?

| क | ख |
|---|---|
| रामा **जातो** | रामा **जात आहे–नाहीं**<br>रामा **जात होता–नव्हता**<br>रामा **जात असेल–नसेल**<br>रामा **जात असावा–नसावा** |
| रामा **गेला** | रामा **गेला आहे–नाहीं**<br>रामा **गेला होता–नव्हता**<br>रामा **गेला असेल–नसेल** |
| ( १ ) ह्यांत रामाच्या **जाण्या**बद्दल बोलावयाचें आहे. | ( १ ) ह्यांतही रामाच्या **जाण्या**बद्दल बोलावयाचें आहे. |
| ( २ ) ह्यांत 'जातो' व 'गेला' ह्या एकट्या एकट्या शब्दांच्या योगानें वाक्यांचा अर्थ पूर्ण होत आहे; म्हणून हे एकटे एकटे शब्दच येथें क्रियापदें आहेत. | ( २ ) ह्यांत जाण्याबद्दलच बोलावयाचें आहे खरें, परंतु तें केवळ 'जात,' 'गेला,' एवढ्याच क्रिया-शब्दांनीं पूर्ण सांगून होत नाहीं; त्या शब्दांच्या पुढें आणखी क्रियापदें घालावीं लागलीं आहेत. |

(३) ह्यांत बोलणाराचा कोणती क्रिया झाली, हें सांगण्याचा अर्थ, एकेकाच वाक्याचा अर्थ पूर्ण करणाऱ्या क्रियावाचक शब्दानें म्हणजे 'जातो' व 'गेला' ह्या एकेरी क्रियापदानें पूर्णपणें व्यक्त होत आहे.

(४) ह्यांत आहे—नाहीं असे दुसरे क्रिया-शब्द नसून, **जाणें** ही दोन्ही वाक्यात एकच क्रिया आहे, व त्या जाण्याबद्दलच बोलावयाचें असल्यामुळें, तीच ह्या वाक्यांत **मुख्य क्रिया आहे.**

(३) ह्यांत बोलणाराला ज्या मुख्य क्रियेबद्दल बोलावयाचें आहे, ते त्या एकट्याच अर्धवट अशा क्रिया-शब्दावरून पूर्ण कळत नाहीं; तो अर्थ पुरा कळण्यासाठीं मुख्य क्रिया-शब्दाला दुसऱ्या क्रिया-पदाची जोड द्यावी लागत आहे.

(४) ह्यांत जरी दोन क्रिया आहेत, तरी केवळ आहे-नाहीं, होता-नव्हता, एवढेंच सांगावयाचें नसून, मुख्यतः **जाण्या-**बद्दलच सांगावयाचें असल्यामुळे, तीच क्रिया मुख्य आहे; व त्या क्रिया-शब्दांपुढें असलेल्या क्रिया-पदांतील **क्रिया मुख्य नाहीं.**

यावरून केव्हां केव्हां वाक्यांतील मुख्य क्रियेला जोडून **आहे—नाहीं, होता—नव्हता, असेल—नसेल,** अशा प्रकारचीं कांहीं क्रियापदें येतात; तीं मुख्य नसलीं तरी मुख्य क्रियांना मदत करून, त्यांना सहाय होऊन, त्यांच्या पाहिजे असलेल्या अर्थाची पूर्णता करितात; असें दिसतें. यांना काय नांव द्यावें बरें? तीं मुख्य क्रियांना सहाय करितात, म्हणून त्यांना "**सहाय क्रियापदें**" असें म्हणण्यास हरकत नाहीं; आपण त्यांना तेंच नांव देऊं या.

मुख्य क्रियेला मदत करण्यासाठीच जेव्हां दुसरें क्रियापद त्या

मुख्य क्रियेच्या शब्दापुढें येतें, तेव्हांच त्याला '**सहाय क्रियापद**' म्हणावयाचें; एरव्हीं स्वतंत्र आल्यास तें '**सहाय क्रियापद**' होणार नाहीं, हें ध्यानांत ठेवावयास पाहिजे. उदाहरणार्थः—

| [ येथें **सहाय क्रियापद नाहीं** ] | [ येथें **सहाय क्रियापद आहे** ] |
|---|---|
| ( १ ) मजजवळ एक पेरू **आहे** | ( १ ) मला पेरू मिळाला **आहे** |
| ( २ ) त्याजवळ रुपये **नाहींत** | ( २ ) त्याला रुपये दिले **नाहींत** |
| ( ३ ) तो रस्त्यांतच **होता** | ( ३ ) तो रस्त्यांत लोळत **होता** |
| ( ४ ) तूं कामाला **लाग** | ( ४ ) तूं काम करूं **लाग** |

[ २ ]

अशा रीतीनें असणे, नसणे, होणें, जाणे, येणें, देणे, टाकणें, लागणें, इ० क्रियांपासून 'सहाय क्रियापदें' होतात; व तीं मुख्य क्रियेला मदत करण्यासाठीं येतात; मुख्य क्रियेच्या अर्थाची त्या दोहोंमिळून पूर्णता होते; म्हणून त्या दोन्ही क्रियामिळून होणाऱ्या क्रियापदाला "**संयुक्त क्रियापद**" असें नांव आहे.

| [ **हें नुसतें क्रियापद** ] | [ **हें संयुक्त क्रियापद** ] |
|---|---|
| मारितो | 'मारीत आहे' |
| दिलें | 'दिलें नाहीं' |
| गेला | 'जाऊं लागला' |
| लिहिलें | 'लिहून काढिलें' |

याप्रमाणें आपल्यास "**संयुक्त क्रियापदें**" ओळखतां येतील, तथापि केवळ दोन क्रिया-शब्द जवळ जवळ दिसले, म्हणून

तेवढ्यावरून त्यांना "**संयुक्त क्रियापद**" म्हणावयाचें नाहीं; नीट विचार करून, मुख्य क्रियेला सहाय करण्यासाठींच पुढें दुसरें क्रियापद येईल व त्या दोहोंमिळून मुख्य क्रियेचा अर्थ पूर्ण होत असेल, तेव्हांच त्या ठिकाणीं "**संयुक्त क्रियापद**" म्हणावयाचें. उदाहरणार्थ–"रामा गोविंदाला मारीत आहे" येथे '**मारीत आहे**' हें संयुक्त क्रियापद; परंतु "तो उड्या मारीत, चालतो" ह्या ठिकाणीं 'मारीत चालतो' असें संयुक्त क्रियापद नाहीं; कारण, 'मारीत' ह्या शब्दानें कसा चालतो ती क्रियेची रीत म्हणजे क्रियेचा एक प्रकारचा गुण कळत असल्यानें, ह्या ठिकाणीं 'मारीत' हा शब्द **क्रियाविशेषण** अव्यय आहे; संयुक्त क्रियापदातला नाहीं.



एवढ्यावरून आपल्याला कोणत्या गोष्टी कळल्या ?

**१. कांहीं क्रियापदें वाक्यांतील दुसऱ्या मुख्य धातूंना मदत करण्यासाठीं येतात; त्यांना "सहाय क्रियापदें" म्हणतात.**

**२. मुख्य क्रियेच्या अर्थाची पूर्णता करण्यासाठीं जेव्हां त्या क्रिया-शब्दाला सहाय क्रियापद जोडून येतें, तेव्हां त्या दोन्ही मिळून होणाऱ्या क्रिया-शब्दांना "संयुक्त क्रियापद" असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. "**सहाय क्रियापद**" म्हणजे काय ? तें वाक्यांत कोठें येतें ?

२. "**संयुक्त क्रियापद**" म्हणजे काय ?

**३. अस, नस, व हो, हीं सहाय क्रियापदें जोडून संयुक्त क्रियापदें होतील अशीं दोन दोन वाक्यें लिहा.**

४. खालील वाक्यांतील संयुक्त क्रियापदें कोणतीं ? व एकेरी क्रियापदें कोणतीं ?

( १ ) रंगू घरीं जात होता. ( २ ) तो ठेच लागून पडला. ( ३ ) बाळू, तुझा गडवा कशाचा केला आहे? ( ४ ) ते ऐकून शेतकरी धावून आले. ( ५ ) आपल्या झोपाळ्याच्या कड्या पितळेच्या आहेत. ( ६ ) त्या पितळेच्या बनविलेल्या आहेत. ( ७ ) कोळी भिंतीवर चढूं लागला. ( ८ ) हीं मुलें तुला ओळखतां येतील. ( ९ ) ईश्वरानेंच आपणांस बुद्धि दिली आहे. ( १० ) पण आपलें ज्ञान मर्यादित आहे. ( ११ ) ह्या गोष्टीस आठ-चार दिवस गेले. ( १२ ) पाटीलबुवा जेवून डेऱ्यास गेले होते. ( १३ ) त्यांनीं नानांची वाट पाहिली नाहीं.

---

# ४. क्रियापदांचे काळ

आपल्याला क्रियापदांचे **काळ** व **अर्थ** हीं कळतात; परंतु कोणत्याही क्रियापदाचे हे **काळ** व **अर्थ** होण्यांत कांहीं ठराविकपणा आढळतो कीं काय, तें आपण आतां पाहूं.

( १ ) **वर्तमानकाळ**

| | | [ अकर्मक ] | [ सकर्मक ] |
|---|---|---|---|
| ह्या प्रत्येक ठिकाणीं ‘जा’ व ‘शीक’ हे मूळ धातु आहेत; व यांतील सर्व क्रियापदें वर्तमानकाळीं आहेत, हें उघडच आहे. | प्र० | मी जा**तों** | मी शिक**तों** |
| | द्वि० | तूं जा**तोस** | तूं शिक**तोस** |
| | तृ० | तो जा**तो** | तो शिक**तो** |
| | ,, | ती जा**ते** | ती शिक**ते** |
| | ,, | तें जा**तें** | तें शिक**तें** |

यावरून सर्व **वर्तमानकाळीं** क्रियापदें अशा रीतीनें आपल्या भाषेंत होत असावींत, असें दिसतें.

( २ ) **भूतकाळ**

ह्या ठिकाणींही ‘जा’ व ‘शीक’ हेच मूळ धातु आहेत; व ह्यांतील सर्व भूतकाळीं क्रियापदे आहेत, हें स्पष्टच आहे.

| | [ अकर्मक ] | [ सकर्मक ] |
|---|---|---|
| प्र० | मी गे**लों** | मी शिक**लों** |
| द्वि० | तूं गे**लास** | तूं शिक**लास** |
| तृ० | तो गे**ला** | तो शिक**ला** |
| ,, | ती गे**ली** | ती शिक**ली** |
| ,, | ते गे**लें** | ते शिक**लें** |

यावरून आपल्या भाषेंत **भूतकाळीं** क्रियापदे अशाच रीतीनें होतात, असें दिसतें.

( ३ ) **भविष्यकाळ**

येथेही ‘जा’ व ‘शीक’ हेच मूळ धातु आहेत; व हीं सर्व क्रियापदें भविष्यकाळीं आहेत.

| | [ अकर्मक ] | [ सकर्मक ] |
|---|---|---|
| प्र० | मी जा**ईन** | मी शि**केन** |
| द्वि० | तूं जा**शील** | तूं शिक**शील** |
| तृ० | तो जा**ईल** | तो शि**केल** |
| ,, | ती जा**ईल** | ती शि**केल** |
| ,, | तें जा**ईल** | तें शि**केल** |

यावरून अशाच रीतीनें **भविष्यकाळीं** क्रियापदें आपल्या भाषेंत होत असावींत, असें दिसतें.

यावरून आपल्यास विचार केल्यास कळून येईल कीं, धातूवरून **वर्तमानकाळ, भूतकाळ** व **भविष्यकाळ** दाखविणारीं तीन

प्रकारचीं क्रियापदांचीं रूपे आपल्या भाषेंत होतात; तीं बहुतेक वरच्याप्रमाणेंच ठराविक रीतीनें होत असावींत.

---

### प्रश्न व गृहपाठ

१. खा, ये, दे, पी, बस, मार, घे, शीक, पड, बोलाव, रड, नाच, पाह, लिह, यांपैकीं दोन दोन धातूंवरून बनलेली पाठातल्याप्रमाणें **वर्तमान, भूत व भविष्यकाळीं** क्रियापदांची रूपे घरून लिहून आणा.

---

## ५. क्रियापदांचे अर्थ

आतां धातूवरून होणाऱ्या कालदर्शक क्रियापदांच्या रूपांप्रमाणेंच खालील अर्थदर्शक क्रियापदांच्या रूपांमध्येंही कांहीं ठराविकपणा आढळतो कीं काय, तें पहा बरें ?

(४) **आज्ञार्थ**

येथेंही 'जा' व 'शीक' हेच मूळ धातु आहेत, आणि त्यांचीं आज्ञार्थी क्रियापदे ठराविक रीतीनेंच होत आहेत, हें उघड

| | [ अकर्मक ] | [ सकर्मक ] |
|---|---|---|
| प्र० | मी जाऊं ? | मी शिकूं ? |
| द्वि० | तूं **जा** | तूं शीक |
| तृ० | तो जाओ, जावो | तो शिको |
| ,, | ती जाओ, जावो | ती शिको |
| ,, | तें जाओ, जावो | तें शिको |

आहे. यांत द्वितीय पुरुषीं रूप निराळें दिसत नाहीं खरें, परन्तु तेथें धातूचें मूळ रूपच कायम राहतें; हाच ठराविकपणा सर्वत्र आढळून

येतो. अर्थात् हीं **आज्ञार्थी** क्रियापदेंही आपल्या भाषेंत ठराविक रीतीनेंच होतात; असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

(५) **विध्यर्थ** [ अकर्मक ] [ सकर्मक ]

ह्या ठिकाणीं विशेषत: इच्छा किंवा कर्तव्य हा अर्थ असल्यामुळें हीं सर्व विध्यर्थी क्रियापदें आहेत, हें उघडच

| | | |
|---|---|---|
| तृ० | त्यानें **जावें** | त्यानें घडा शिका**वा** |
| ,, | तिनें **जावें** | तिनें विद्या शिका**वी** |
| ,, | त्यानें **जावें** | त्यानें शास्त्र शिका**वें** |

आहे; तरी पण येथेंही आपल्याला हीं रूपें होण्यांत ठराविकपणाच आढळून येत आहे. **विध्यर्थी** क्रियापदें अशाच रीतीनें आपल्या भाषेंत बनतात, असें दिसतें.

(६) **संकेतार्थ**

ह्यांतील क्रियापदें संकेतार्थी आहेत, हें उघडच आहे. हीं क्रियापदें ठराविक रीतीनेंच येतात, हें बाजूच्या

१. जर मी कथेला जा**तों**,
तर मला खिरापत मिळ**ती**.
२. जर तो गायन शिक**ता**,
तर त्यांत सहज नांव कमाव**ता**.

उदाहरणांवरून स्पष्ट दिसत आहे; तेव्हां **संकेतार्थी** क्रियापदेंही अशाच ठराविक रीतीनें व 'जर' आणि 'जरी' हे शब्द संकेत-वाक्याच्या आरंभीं आणि 'तर' व 'तरी' हे शब्द संकेतावलंबी वाक्याच्या आरंभीं येऊन होतात, असें दिसतें.

आतां कवितेंत येणारीं क्रियापदांचीं पुढील पानांतील रूपें पहा. त्यांना आपण तूर्त "पद्यरूपें" असें म्हणूं.

( ७ ) **पद्यरूपें**

१. ओढा **वदे** (वदतो) तो तरि काय ऐका

२. तुका **म्हणे** (म्हणतो) त्याची कोण **जाणे** (जाणतो) कळा

३. **दे** (देतो) दान गुप्त उपकार **करी** (करितो) न **बोले** (बोलतो)

४. वनीं **खेळती** (खेळतात) बाळ ते बल्लवांचे

५. तुरे **खोविती** (खोवितात) मस्तकीं पल्लवांचे

६. भोजन **दे** (देत असे) चोराला

७. आदर आग्रह **करी** (करीत असे) स्वये मोठा

हीं क्रियापदांचीं रूपें मागल्या सर्व रूपांपेक्षां निराळ्या प्रकारचीं आहेत, हें उघडच आहे; व हीं विशेषत: कवितेंत येतात, असे आपल्यास दिसून येतें. ह्यांच्या योगानें काळ व अर्थ हीं कळतातच; पण ही रूपें विशेषत: कवितेंतच येणारी आहेत; व तीं नेहमींच्या आपल्या बोलण्यांतल्या रूपांपेक्षां निराळीं आहेत; म्हणून आपण त्यांचा एक निराळाच गट मानूं या.

एकंदरींत असें दिसतें कीं, आपल्या भाषेंत वरील-**प्रमाणें एकंदर** सात **प्रकारचीं** क्रियापदाचीं रूपें येतात; त्यांपैकीं तिहींवरून मुख्यत: '**काळ**' कळतो; दुसऱ्या तिहींवरून मुख्यत: '**अर्थ**' कळतो; आणि '**पद्यरूपें**' हीं विशेषत: कवितेंतच येतात. हीं रूपें होण्यांत कांहीं ठराविकपणा आहे, असें आपल्यास वरतीं आढळून आलें. हीं **काळ, अर्थ** व **पद्यरूपें,** आपल्यास सहज कळून येतात; व कोणत्याही क्रियापदाचें कोणत्याही काळीं

व कोणत्याही अर्थी रूप आपल्या नेहमींच्या सवयीमुळें आपल्यास करितां येतें; तरी आपल्या भाषेंत एकेका क्रियापदाचे वरील ठराविक रीतीनें सात प्रकार होतात, हें आपणांस ध्यानांत ठेवावयास हवें.

   

आज आपण कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. आपल्या भाषेंत एकेका क्रियापदाचीं एकंदर सात प्रकारचीं रूपें होतात.**

**२. वर्तमानकाळ, भूतकाळ, भविष्यकाळ; आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ; व पद्यरूपें; हे ते सात प्रकार होत.**

**३. हीं सात प्रकारचीं रूपें होण्यांत बराच ठराविकपणा आहे.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील क्रियापदांची रूपें कोणत्या काळांतील व कोणत्या अर्थी आहेत, ते सांगा:—

( १ ) सकाळीं उठोनी देवासी **भजावें.** ( २ ) चांगले कुत्रे माणसाचा हुकूम **बजावितात.** ( ३ ) बरे सत्य **बोला.** ( ४ ) वाणी पराला हित तेंच **सांगो.** ( ५ ) परोपकारीं तव देह **लागो.** ( ६ ) मावशीच्या मुलीस मावसबहीण **म्हणावें.** ( ७ ) मुलें **चकलीं.** ( ८ ) आई मला **रागावेल.** ( ९ ) खालीं-वरी हा **पसरे** प्रकाश. ( १० ) विणा हातिं गीतें अलापीत **चाले.**

२. दे व पी ह्यांपासून होणारीं **आज्ञार्थी** क्रियापदरूपें लिहून आणा.

३. खा व मार ह्या धातूंवरून होणारी **विध्यर्थी** क्रियापदरूपें लिहून आणा.

४. क्रियापदाचीं **संकेतार्थी** तीन व **पद्यरूपें** असलेलीं तीन वाक्यें लिहून आणा.

---

# ६. संयुक्त-क्रियापदांतील क्रिया, कर्ता व कर्म

वाक्यांतील क्रिया करणारा कोण तें दाखविणारा शब्द तो **कर्ता;** काय करायचें, काय द्यायचें, काय घ्यायचें किंवा क्रिया कोणावर घडते, हें दाखविणारा शब्द ते **कर्म;** हें आपल्याला माहीत आहेच. यांच्यासंबंधानें आतां आपण थोडा अधिक विचार करूं.

| (१) | (२) |
|---|---|
| रामा सदूला **मारितो** | रामा सदूला **मारीत आहे–नाहीं.**<br>रामा सदूला **मारीत होता–नव्हता.**<br>रामा सदूला **मारीत असेल–नसेल.** |
| रामानें सदूला **मारिलें** | रामानें सदूला **मारिलें आहे–नाहीं.**<br>रामानें सदूला **मारिलें होतें–नव्हतें.**<br>रामानें सदूला **मारिलें असेल–नसेल.** |
| रामा सदूला **मारील** | रामा सदूला **मारणार आहे–नाहीं.**<br>रामा सदूला **मारणार होता–नव्हता.**<br>रामा सदूला **मारणार असेल–नसेल.** |

वरच्या वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांत **एकेरी** क्रियापदें आहेत, व दुसऱ्या वाक्यांत **संयुक्त** क्रियापदें आहेत. पहिल्या वाक्यांत मारण्याची क्रिया आहे, यांत संशय नाहींच; म्हणून त्या वाक्यांत क्रिया करणारा रामाच आहे, ह्यामुळें त्या वाक्यांतून अनुक्रमें 'रामा,' 'रामानें' व 'रामा,' हे कर्ते आहेत; हें उघडच आहे.

परंतु दुसऱ्या ठिकाणच्या वाक्यांत क्रिया कोणती आहे? **मारण्याची** कीं **असण्याची, नसण्याची**?

आपल्याला विचार केल्यास कळून येईल कीं, येथेंही पहिल्या वाक्यांतल्या प्रमाणेंच **मारण्याची** क्रिया आहे; 'असण्याची,' 'नसण्याची,' कांहीं येथें क्रिया नाहीं. **मारणें** ह्या मुख्य क्रियेची काळाच्या दृष्टीनें पूर्णता करण्यासाठीं 'आहे'–'नाहीं,' 'होता'–'नव्हता,' 'असेल'–'नसेल,' हीं सहाय क्रियापदें आलीं आहेत. अर्थात् ह्या वाक्यांतूनही **मारण्याची** क्रिया करणारा 'रामा'च असल्यामुळें, त्या वाक्यांतून अनुक्रमें 'रामा,' 'रामानें' व 'रामा,' हेच कर्ते आहेत; हें उघड आहे.

तेव्हां '**संयुक्त**' क्रियापदांमधील मुख्य क्रिया कोणती, ती पाहूनच, ती क्रिया करणारा कोण, याचा विचार केला पाहिजे; म्हणजे '**संयुक्त**' क्रियापदें असलेल्या वाक्यांतील **कर्ता** आपल्यास कळेल; असें झालें.

   

आज आपण काय विचार केला?

**१. संयुक्त-क्रियापदांतील कर्ता-कर्म ओळखण्यास मुख्य क्रिया पहावी लागते.**

## प्रश्न व गृहपाठ

१. 'संयुक्त' क्रियापदांतील कर्ता, कर्म, हीं कशीं ओळखावीं?

**२. कर्ता, कर्म, ओळखण्यासाठीं मुख्यतः कोणती गोष्ट पहावी लागते ?**

३. खालच्या वाक्यांत संयुक्त-क्रियापदें असतील, त्या वाक्यांचीं कर्ता व कर्म हीं सांगाः—

( १ ) वारा मंद वाहत आहे, ( २ ) पारिजातकांच्या फुलांचा सुगंध सुटला आहे, ( ३ ) आकाशांत स्वच्छ चांदणें पडलें आहे, ( ४ ) अशा वेळीं अंगणांत बसून सर्व मुलें गप्पा मारीत होतीं. ( ५ ) गंगेंत कोणी उड्या मारीत आहेत, ( ६ ) कोणी पाण्यानें कुप्या भरून घेत आहेत, ( ७ ) कोणी संकल्प सागण्यांत गुंतले आहेत, ( ८ ) असे आढळून आलें.

---

# ७. प्रयोग

## [ १ ]

कोणत्याही वाक्यांतील **क्रिया, कर्ता** व **कर्म** हीं कशीं ओळखावीं, ह्यासंबंधाचा आपण मागील पाठांत विचार केला; आतां निरनिराळ्या प्रकारच्या वाक्यांच्या प्रयोगांसंबंधाने आणखी ज्यास्त विचार करूं.

१. शिपाई चोर धरितो—**कर्तरि** (कर्त्याप्रमाणें क्रियापद)

२. शिपायानें चोर धरिला—**कर्मणि** (कर्माप्रमाणें क्रियापद)

३. शिपायाने चोरास धरिलें—**भावे** (कर्ता व कर्म ह्यांप्रमाणें क्रियापद नाहीं)

१. शहाणा सत्य आचरितो—**कर्तरि** (कर्त्याप्रमाणें क्रियापद)
२. शहाण्यानें सत्य आचरावें—**कर्मणि** (कर्माप्रमाणें क्रियापद)
३. शहाण्यानें सत्यास वरावें—**भावे** (कर्ता व कर्म ह्यांप्रमाणें क्रियापद नाहीं)

१. सज्जन धर्माला सोडीत नाहीं—**कर्तरि** (कर्त्याप्रमाणें क्रियापद)
२. सज्जनानें धर्म सोडूं नये—**कर्मणि** (कर्माप्रमाणें क्रियापद)
३. सज्जनानें धर्मास सोडूं नये—**भावे** (कर्ता व कर्म ह्यांप्रमाणें क्रियापद नाहीं)

वरच्या वाक्यांतील कर्ता व कर्म हीं कशीं आहेत, व क्रियापद कोणाप्रमाणें फिरत आहे, हें पाहून आपल्यास त्या व तशा वाक्यांतील प्रयोग सहज ओळखतां येतात.

## [ २ ]

आतां खालील वाक्यें पहा; त्यांतील कर्ता, कर्म, हीं कशीं आहेत तेंही पहा; आणि अशा वाक्यांत क्रियापद कोणाप्रमाणें असतें तें ओळखून, त्या वाक्यांची रचना म्हणजे प्रयोग कोणते आहेत, तें ठरवा बरें ?

१. रामानें रावण मारिला
२. रामाच्यानें रावण मारवला
३. रामाला रावण मारवला

} ह्या ठिकाणीं **मारणें** ही क्रिया आहे, व ती करणारा **राम** आहे, म्हणून ह्या वाक्यांत अनुक्रमें **रामानें, रामाच्यानें व रामाला** हे कर्ते आहेत; हें उघडच आहे.

त्याचप्रमाणें मारण्याची क्रिया रावणावर घडत आहे, म्हणून ह्या सर्व ठिकाणीं **रावण** हा शब्द कर्म आहे. तेव्हां ह्यांपैकीं कोणाप्रमाणें येथें क्रियापदें बदलत आहेत बरें ?

( १ ) व ( २ ) ह्या वाक्यांत रामानें व रामाच्यानें, असे तृतीयान्त कर्ते आहेत. अशा वाक्यांत त्या तृतीयान्त कर्त्यांप्रमाणें कधींही क्रियापद फिरत नाहीं; हें आपण मागे पाहिलेंच आहे.

( ३ ) ह्या वाक्यांत रामाला **मारवला,** गंगूला **मारवला,** माकडाला–मला–तुला–त्यांना रावण **मारवला,** ह्याप्रमाणें चतुर्थ्यन्त कर्ता बदलला, तरी त्याप्रमाणें काहीं क्रियापद बदलत नाहीं.

परन्तु ( १ ) ह्या वाक्यांत रावण **मारिला.** पुष्कळ असल्यास **मारिले,** असें होईल; आणि ( २ ) व ( ३ ) ह्या वाक्यांत रावण **मारवला,** पुष्कळ असल्यास **मारवले,** असे होईल; ताटका असल्यास **मारवली,** असें होईल.

म्हणजे येथें कर्मांप्रमाणें क्रियापदें बदलत आहेत; म्हणून हे सर्व **कर्मणि-प्रयोग** आहेत, असें ठरले.

यावरून **रामानें** असाच कर्ता असला व कर्म मूळ शब्द म्हणजे प्रथमान्त असलें तरच कर्मणि-प्रयोग होतो, असें नाहीं; तर **रामाच्यानें, रामाला,** असेही कर्ते असले, पण कर्म मात्र **प्रथमान्तच** असलें, तरीही त्या वाक्यांचा **कर्मणि-प्रयोगच** होतो; असें दिसून येतें.

## [ ३ ]

आतां खालील वाक्यांची रचना कशी आहे, ती पहा:—

**क**

१. रामानें जावें
२. रामाच्यानें जाववत नाहीं
३. रामाला जाववतें

**ख**

१. रामानें रावणास मारिलें
२. रामाच्यानें रावणास मारवलें
३. रामाला रावणास मारवतें

ह्या वाक्यांत मागल्या प्रमाणेंच रामानें, रामाच्यानें, रामाला, असे कर्ते आहेत; पण ह्या कर्त्यांप्रमाणें कांहीं क्रियापदे दोन्ही ठिकाणीं फिरत नाहींत; हें आपण मागें पाहिलेंच आहे. त्याचप्रमाणे रावणास हें दुसऱ्या तीनही वाक्यांत कर्म आहे, त्याप्रमाणेंही क्रियापद फिरवून पाहिल्यास तें फिरत नाहीं; असें आपल्यास दिसून येईल. यावरून हे **भावे प्रयोग** आहेत; हें उघडच झालें.

म्हणजे **रामाच्यानें, रामाला,** असे जरी कर्ते असले, तरी जसा कर्मणि-प्रयोग होतो, तसाच **भावे प्रयोगही** होतो; मात्र भावे प्रयोगांत कर्म प्रथमान्त कधीं नसतें; हें ध्यानांत ठेवावयास हवें.

   

आज कोणत्या गोष्टींचा आपण विचार केला ?

**१. 'रामाच्यानें,' 'रामाला,' अशा प्रकारचे कर्ते असल्यास कर्मणि किंवा भावे प्रयोग होतो.**

**२. कर्मणि-प्रयोगांत वरच्यासारखे कर्ते असले, तरी कर्म प्रथमान्तच पाहिजे.**

**३. भावे प्रयोगांतही वरच्यासारखे कर्ते असले, तरी चालतात; पण कर्म द्वितीयान्तच पाहिजे.**

**४. अकर्मक धातु असल्यास 'रामाच्यानें,' 'रामाला,' असे कर्ते असले, तर अकर्मक भावे प्रयोग होतो.**

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यातील **प्रयोग** ओळखा:—

( १ ) भरतानें कैकेयीची निर्भर्त्सना केली. ( २ ) सॉक्रेटीस शहरांतील मुलांस बिघडवितो. ( ३ ) फलाहारानें मुक्ति मिळत नाही. ( ४ ) कुशल कारागिराच्यानें तरी अशी मूर्ति घडवेल ? ( ५ ) मला कामाला जाववतें. ( ६ ) स्वपक्षीयानी त्रिबकरावास मारले नाही. ( ७ ) त्या दाईच्यानें मुलाची जोपासना नीट होणार नाही. ( ८ ) ह्या दाईला नीट करिता येईल. ( ९ ) आम्ही दूध सांडले. ( १० ) मला बसवतें. ( ११ ) लोकाचें मांद्य घालवून या सत्संगतीनेच सर्व संत केले. ( १२ ) सत्संगति आपल्या गुणांनी आपल्या सर्व आश्रितांस शोभविते. ( १३ ) पापक्षय होण्यासाठी साधूची संगति कोण इच्छीत नाही ? ( १४ ) ज्यानें गर्वोद्धतानाही गर्वहीन केलें. ( १५ ) हें भल्याचें खड्गाग्रतुल्य व्रत आहे. ( १६ ) विपत्तिसमयीही जो हीनता दाखवीत नाही. ( १७ ) ज्यांनी स्वकृतोपकारविभवें विस्तारिली आहेत. ( १८ ) आम्ही तरी ह्या यज्ञाचा मत्सर करणार नाही. ( १९ ) शकुनि कुरुनाथा म्हणे. ( २० ) हा सर्वांनीं मिळोनि मारावा. ( २१ ) जगात ज्याला अद्रींद्र हें प्रसिद्ध नांव मिळालें. ( २२ ) मला कां इतक्यांत बाहेर घालता ? ( २३ ) काही केल्या तिची समजूत पटेना. ( २४ ) तूं श्लोक लिहिले. ( २५ ) रेल्वेनें लौकर प्रवास करिता येतो.

# ८. विशेषणांचे भेद

---

क

[ १ ]

**सुंदर** मुलगा
**उत्तम** चित्र
**लुच्चा** मनुष्य
**असा** अंगरखा
**गाणारी** मुलगी

ह्या ठिकाणीं **सुंदर, उत्तम, लुच्चा, असा, गाणारी,** ह्या शब्दांनीं पुढील नामें कशी आहेत, तें सांगितलें आहे; म्हणजे त्या नामांचा **गुण** सांगितला आहे. अशा प्रकारचीं म्हणजे **गुण दाखविणारीं** कांहीं विशेषणें असतात; हे आपल्यास पूर्वीच माहीत झाले आहे.

त्याचप्रमाणें—

ख

**एक** गाय
**दोन** कुत्रे
**शंभर** रुपये
**हजार** मोहरा
**दीड** आणा

ह्या ठिकाणीं **एक, दोन, शंभर, हजार, दीड,** ह्या शब्दांनीं पुढील नामांची संख्या दाखविली आहे; म्हणजे तीं नामें किती आहेत हें सांगितलें आहे. अशा प्रकारचीं संख्या दाखविणारींही कांहीं विशेषणें असतात, हेंही आपल्यास पूर्वीच माहीत झालेलें आहे.

म्हणजे गुण दाखविणारीं व संख्या दाखविणारीं अशीं दोन प्रकारचीं विशेषणें असतात; असें झालें. यांना अनुक्रमें ( १ ) **गुणविशेषण** किंवा नुसतेंच विशेषण आणि ( २ ) **संख्याविशेषण**

असें म्हणतात. (विशेषण ज्या नामाचा गुण दाखवितें त्याला **विशेष्य** असें म्हणतात. 'चांगला घोडा' यांत चांगला हें विशेषण व घोडा हें **विशेष्य;** याप्रमाणें.)

[ २ ]

आतां खालील वाक्यांतील विशेषणांमध्यें काय फरक आहे, तो लक्षपूर्वक पहाः—

| | |
|---|---|
| १. **चांगला** मुलगा अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत नाहीं. | २. हा मुलगा **चांगला** आहे, म्हणून तो अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत नाहीं. |

ह्या दोन्ही ठिकाणीं **चांगला** कोण ? मुलगा. म्हणून **चांगला** हें विशेषण मुलाचेच नाहीं का ? पण तें पहिल्या वाक्यांत मुलगा ह्या नामाच्या अगोदर आलेलें आहे; व दुसऱ्या वाक्यात मुलगा ह्या नामाच्या मागून आलेले दिसत आहे. त्याचप्रमाणें:—

| | |
|---|---|
| १ हा **पिकलेला** आंबा मला दे. | २. हा आंबा **पिकलेला** आहे. |
| १. तो **लुच्चा** मनुष्य खोटें बोलतो. | २. तो मनुष्य **लुच्चा** आहे. |
| १. मीं **चांगली** पुस्ती काढिली. | २. मीं काढलेली पुस्ती **चांगली** आहे. |

ह्या ठिकाणींही **पिकलेला** हा शब्द आंबा ह्या नामाचें, **लुच्चा**

हा शब्द मनुष्य ह्या नामाचें व **चांगली** हा शब्द पुस्ती ह्या नामाचें, विशेषण आहे, हे उघडच आहे; परंतु पहिल्या वाक्यांतील विशेषणें नामांच्या पूर्वीं व दुसऱ्या वाक्यांतील विशेषणें नामांच्या मागून आलेलीं दिसतात. हीं दुसऱ्या वाक्यांतील विशेषणें नामांचीं असून, तीं क्रियापदाजवळ येतात; व विधान पूर्ण करण्यास मदत करितात; म्हणून त्यांस "**विधिविशेषणें**" असें म्हणतात.

[ ३ ]

आतां खालील विशेषणें काय काम करितात तें पहा:—

१. विमल **चांगलें** गातें.
२. तो इंग्रजी **चांगलें** बोलतो.
३. त्या **तिरवें** बघतात.
४. माझ्यानें **उताणें** पोहवतें.
५. रंगू **तिरपें** लिहिते.

ह्यांतील पहिल्या वाक्यांत **चांगलें** हा शब्द विमलचें विशेषण नाहीं; तर येथे गाते कसें हे **चांगलें** ह्या शब्दानें सांगितलें आहे. दुसऱ्या वाक्यांतही **चांगलें** हें तो या शब्दाचें विशेषण नसून, बोलतो कसें हें त्याच्या योगानें कळत आहे. तिसऱ्या वाक्यांत **तिरवें** हें त्या ह्या शब्दाचें विशेषण नसून, त्याच्या योगानें बघतात कसें हें कळत आहे. त्याचप्रमाणें चौथ्या वाक्यांत **उताणा** मी असें सांगावयाचें नसून, पोहवतें कसें तें सांगावयाचें आहे. पांचव्या वाक्यांतही **तिरपें** हा शब्द रंगू कशी ते सांगत नसून, लिहिते कसे तें सांगत आहे; या गोष्टी थोड्या विचारानें आपल्या ध्यानांत येतात.

यावरून असें दिसतें कीं, हीं विशेषणें या ठिकाणीं नामांचीं नाहींत तर तीं क्रियेचीं आहेत; तथापि तीं चांगला—चांगली—चांगलें,

तिरवा—तिरवी—तिरवें, उताणा—उताणी—उताणें, तिरपा—तिरपी—तिरपें, अशीं बदलतात, म्हणून त्यांना अव्ययें असें म्हणतां येणार नाहीं; पण तीं विशेषणें तर आहेतच व क्रियेचा गुण दाखवितात म्हणून त्यांस नुसतें "**क्रियाविशेषणें**" असें म्हणण्यास हरकत नाहीं.

   

यावरून कोणत्या गोष्टी आपणांस आढळून आल्या ?

**१. विशेषणें दोन प्रकारचीं आहेत. ( १ ) "गुणविशेषणें" व (२) "संख्याविशेषणें."**

**२. कांहीं विशेषणें नामाच्या अगोदर येतात व कांहीं नामाच्या मागून क्रियापदाजवळ येतात; व विधान पुरें करण्यास मदत करितात; म्हणून त्यांस "विधिविशेषणें" म्हणतात.**

**३. कांहीं बदलणारीं विशेषणें क्रियेचाच गुण दाखवितात; म्हणून त्यांस क्रियाविशेषण अव्ययें असें न म्हणतां नुसतें "क्रियाविशेषणें" असेंच म्हणतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. **विशेषणें** किती प्रकारची आढळतात ? **विशेष्य** म्हणजे काय ?

२. **विधिविशेषणें** म्हणजे काय ?

३. खालील वाक्यातील **विधिविशेषणें** व **क्रियाविशेषणें** निरनिराळीं लिहून आणा. अव्ययें असल्यास सोडून द्याः—

( १ ) दूध पाजून कोण **उगें** करिते ? ( २ ) कावळा तहानेने **घाबरा** झाला. ( ३ ) मीं तिला **हळूच** ढकलिले. ( ४ ) तीं **लौकर** शाळेंत गेली. ( ५ ) मनीं **हट्टी** आहे. ( ६ ) तो पोर **लबाड** दिसतो. ( ७ ) रुपे **पांढरें** असतें. ( ८ ) नवरी मुलगी **गोरी** आहे. ( ९ ) मी **शहाणा** आहे. ( १० ) महायुद्धांत तो शिपाई **लंगडा** झाला. ( ११) तो **उभा** राहतो. (१२) तिनें कागद **वाकडा** धरिला. ( १३ ) तूं **चांगला** बस. ( १४) तीं **उपडी** निजते.

# ९. क्रियाविशेषण अव्ययांचे भेद

क्रियेचा गुण दाखविणारे शब्द आपल्यास माहीत आहेत, त्याच्यामध्ये आतां अर्थाच्या दृष्टीनें कांहीं प्रकार आढळल्यास पाहूं.

[ १ ]

(१) तूं **येथें** बस, **तेथें** बसूं नको
**इकडे** या, **तिकडे** जाऊं नका
**दूर** सरका, **मागें** बसा
**जेथें** जातो, **तेथें** तू सांगाती
**खालीं वर सर्वत्र** अंधार
**कोणीकडे** जावे तें कळेना

ह्यांतील जाड्या अक्षरांतील शब्दांवरून आपल्याला क्रियेचें **ठिकाण** कळत आहे, हें स्पष्टच आहे; व हीं क्रियाविशेषण अव्ययें आहेत; म्हणून आपण ह्याना **ठिकाण** दर्शविणारीं ह्या अर्थाचें "**स्थलवाचक**" क्रियाविशेषण अव्यये असे नाव देऊं या.

(२) **काल** मीं नाटक पाहिले
**आज** सिनेमाला जाईन
**रोज** कां त्रास देतोस ?
**एव्हां** येऊं नको
**जेव्हां** बोलावीन **तेव्हां** ये
**परवां** ताईचें **लग्न** आहे
**वारंवार** कां विचारतोस ?

ह्यांतील जाड्या अक्षरातील शब्दांवरून आपल्याला क्रियेची **वेळ** कळत आहे; व हीही क्रियाविशेषण अव्ययेच आहेत; यांना आपण **वेळ** दाखविणारीं म्हणून त्या अर्थाचें "**कालवाचक**" क्रियाविशेषण अव्ययें असें नांव देऊं.

(३) **हळू** बोल. **लौकर** उठ
**उगीच** बरोबर चल
**खरोखर** तो लुच्चा आहे
**मुद्दाम** कां चिडवितोस?
**व्यर्थ** जन्मलास
छडी **छमछम** लागते
मी दूध **गटगटां** किंवा
**गटागट** पितो

ह्या ठिकाणच्या जाड्या शब्दांवरून आपल्याला साधारणपणें क्रियेची **रीत** किंवा **प्रकार** कळत आहे; आणि हीही क्रियाविशेषण अव्ययेंच आहेत; म्हणून त्यांना आपण त्यांच्या अर्थावरून "**रीतिदर्शक**" क्रियाविशेषण अव्यये असें नाव देऊं.

(४) तूं नाटकाला येशील **का**?
त्याला हे चित्र हवे **का**?
मी तुमच्याबरोबर येऊं **काय**?
त्यानच चोरी केली **काय**?

ह्या ठिकाणीं **का** व **काय** हे शब्द कोणत्याही नामाबद्दल आले नसून, ते क्रियेविषयीं **प्रश्न** करण्याकरितांच आले आहेत, हे उघड आहे; म्हणून ह्या त्यांच्या अर्थावरून आपण त्यांस "**प्रश्नार्थक**" क्रियाविशेषण अव्यये असे म्हणूं.

[ २ ]

आतां खालील शब्दांचा आपण ज्यास्त विचार करूं:—

**क**

१. तव जवळी **असून**,
भगवंत नये रे दिसून
२. घरीं **जाऊन**, बाबाना
निरोप सांग
३. मी तुला **बोलून**, दमलों
४. माणूस **पाहून**, त्याच्याशी
वागावें

ह्या ठिकाणच्या जाड्या शब्दांवरून पुढे होणाऱ्या गोष्टींच्या अगोदरची **वेळ** कळत आहे, म्हणून हे शब्द क्रियाविशेषण अव्ययें आहेत, हें उघडच आहे. शिवाय ते धातूवरून साधले आहेत, हे आपल्यास मागे माहीत

झालेलेंच आहे; म्हणून ह्यांस आपण "**धातुसाधित**" क्रियाविशेषण अव्ययें असे म्हणूं.

**ख**

१. **येतां जातां** दुधाकडे पहा
२. शाळेंत **जातांना,** रडूं नये
३. गंगू **बोलतांना** अडखळते
४. रूप **पाहतां** लोचनीं,
हर्ष दाटे हो साजणी

ह्या ठिकाणच्या जाड्या अक्षरांतील शब्दांवरून आपल्याला त्या त्या क्रिया चालू असतांनाच पुढल्या क्रिया घडत आहेत, असें कळत आहे; व हे शब्दही क्रियेची **वेळ** दाखविणारे असल्यामुळे क्रियाविशेषण अव्यये आहेत; शिवाय ते धातूवरून साधले आहेत, हे आपल्यास पूर्वींच माहीत झालें आहे; म्हणून ह्यांनाही आपण "**धातुसाधित**" क्रियाविशेषण अव्यये असें म्हणूं.

**ग**

१. तुवां **देखत** भर्तृघात केला
२. तो **अडखळत,** चालतो
३. मी **चालत** स्टेशनवर गेलों

ह्या ठिकाणच्या जड्या अक्षरांतील शब्दांवरूनही क्रिया होण्याचा **प्रकार** किंवा **रीत** कळत आहे, हे **स्पष्टच** आहे; परंतु हे शब्दही धातूवरून साधले असून, ते क्रियेचे गुण दाखवितात; म्हणून त्यांसही "**धातुसाधित**" क्रियाविशेषण अव्ययें असे आपण म्हणूं.

याप्रमाणें असून, जाऊन, बोलून, पाहून; येतां, जातां, जातांना, बोलतांना, पाहतां; व देखत, अडखळत, चालत; अशा प्रकारचे शब्द क्रियेचा गुण दाखविणारे असून, ते धातूवरून साधतात, असें आपल्यास

दिसून आलें; म्हणून इतर क्रियाविशेषणांप्रमाणेंच " **धातुसाधित** " क्रियाविशेषण अव्ययें हा एक त्यांचा निराळा प्रकार आपण मानूं.

[ या **धातुसाधित** क्रियाविशेषणांपैकी ( क ) याना **पूर्वकालवाचक**, ( ख ) याना **वर्तमानकालवाचक** व ( ग ) यांना **अपूर्णक्रियावाचक** धातुसाधित क्रियाविशेषण अव्ययें म्हणण्याची रीत पडली आहे. ]

[**टीप**–( १ ) **फार** 'हळू' बोलतोस. ( २ ) **अतिशय** 'जलद' पावलें उचल. ( ३ ) **खूप** 'लौकर' वाढ. ह्या वाक्यात 'हळू,' 'जलद' व 'लौकर,' हे अवतरणातील शब्द क्रियाविशेषण अव्ययें आहेतच; **परंतु** किती 'हळू ?' **फार**; किती 'जलद ?' **अतिशय**; व किती 'लौकर ?' **खूप**; हे जाड्या अक्षरांतील शब्द त्या क्रियाविशेषण अव्ययाचे आणखी गुण दाखवितात; तसेच मुख्य क्रियाविशेषण अव्ययाशी त्यांचा **संबंध** असतो; म्हणून त्यांनाही **क्रियाविशेषण अव्ययें** असेच म्हणतात.

**टीप**–(१) मी **फार** 'थोडा' वेळ थाबेन. (२) **अति** 'शहाणा' त्याचा बैल रिकामा. ह्यातील 'थोडा' व 'शहाणा' हे शब्द विशेषणें असून, **फार** व **अति** हे शब्द अनुक्रमें त्याचीं विशेषणें आहेत; अशा विशेषणाच्या विशेषणासही **क्रियाविशेषणें**च म्हणण्याची पद्धत आहे.]

   

आज कोणत्या गोष्टी कळल्या ?

**१. क्रियाविशेषण अव्ययांचे त्यांच्या अर्थावरून मुख्यतः चार प्रकार आढळतात.**

**२. ( १ ) स्थलवाचक, ( २ ) कालवाचक, ( ३ ) रीतिवाचक, आणि ( ४ ) प्रश्नार्थक.**

**३. कालवाचक व रीतिवाचक यांतच धातुसाधित क्रियाविशेषण अव्ययें येतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. **क्रियाविशेषण अव्ययें** किती प्रकारची आढळतात ?

२. कोणत्या दृष्टीनें **क्रियाविशेषण अव्ययांचे** भेद पडतात ?

३. "**धातुसाधित**" क्रियाविशेषण अव्ययें किती प्रकारचीं आढळतात ?

४. पुढील वाक्यांतील **क्रियाविशेषण अव्ययें** कोणत्या प्रकारची आहेत, तें ओळखून लिहून आणाः—

(१) **यंदां** तरी पास व्हाल **का**? (२) **उद्यां** नऊ **वाजतां** ये. (३) रामा स्टेशनवर **जात असतां** मी त्याला थांबविलें. (४) पाऊस **पडून** धान्य पिकतें. (५) ठेंच **लागून** प्राण गेला. (६) **वारंवार** किती सांगावे ? (७) **उत्तरोत्तर** चढती कळा. (८) **प्रतिक्षणीं** पिछेहाट. (९) **बदाबद** मारिलें. (१०) **जोंवर** पैसा **तोंवर** बैसा. (११) हा पेरू खाऊं **काय** ?

५. खालील **क्रियाविशेषण अव्ययें** कोणत्या प्रकारची आहेत ? त्यांवरून कोणता काळ कळतो ?

(१) त्यानें आंत पाऊल **टाकतांच** सर्व उभे राहिले. (२) बी० ए० **होतांच** मी विलायतेस जाईन. (३) **उठतां** लाथ व **बसतां** बुक्की. (४) मीं सूर्य **उगवतांना,** पाहिला. (५) मी गाय **चरतांना,** पाहतों. (६) गाय **चरतांना** आढळेल, तर **घेऊन** ये. (७) तो **निजून,** वाचतो.

६. क्रियाविशेषणाचीं विशेषणें व विशेषणाचीं विशेषणें हीं दोन्ही क्रिया-विशेषणेंच कशी ते खालील उदाहरणें विचारात घेऊन सागा—

(१) मी **फार** लौकर येईन. (२) त्यानें **चांगला** चटकदार निबंध लिहिला. (३) ती **मोठी** चपळ पोरगी आहे. (४) तो **अगदीं** वेडा आहे. (५) त्या **पक्क्या** लुच्च्या मनुष्याच्या हातीं पेटीच्या किल्ल्या पडल्या. (६) **थोडा** आणखी खवा घेऊन ये. (७) **खूप** चांगले आंबे आण. (८) तो **कितपत** काळा आहे ?

---

# १०. उभयान्वयी अव्ययें

[ १ ]

ह्या अव्ययांचेही कोणते निरनिराळे प्रकार पडतात, ते पाहूं:—

**क**

१. रामचंद्र वनवासास चालला,
 '**व**' त्याबरोबर सीताही निघाली.
२. एक कोल्हा होता,
 '**आणि**' एका मांडवावर द्राक्षें होतीं.
३. सर्व सांगितलें,
 '**आणखी**' काय सांगूं?

ह्यांतील जाड्या अक्षरांतील शब्द दोन वाक्यें जोडणारे आहेत व ते उभयान्वयी अव्ययें आहेत; हे शब्द कोणती गोष्ट सांगत आहेत बरें? या वाक्यांमधील **आणि, व, आणखी**, ह्या शब्दांनीं त्या वाक्यांतील दोन्ही गोष्टींचा बोलणाऱ्यास **संग्रह** करावयाचा आहे.

४. रामा **आणि** गोविंदा हे भाऊ भाऊ होते.
५. जगांत चांगलें **व** वाईट हीं दोन्ही असायचींच.

वरील प्रमाणेंच ह्या वाक्यांतही **आणि, व,** ह्याच्यायोगानें ( रामा, गोविंदा; चांगलें, वाईट; ) ह्या शब्दांचा बोलणाऱ्यास एकत्रितपणा किंवा **संग्रह** दाखवावयाचा आहे, असें कळून येते. ( म्हणून ह्यांना "**समुच्चयबोधक**" उभयान्वयी अव्यये असें म्हणतात. )

ख

| | |
|---|---|
| १. माझ्याशीं युद्ध कर<br>‘ **किंवा** ’ भीमाशीं कर.<br>२. माझें दुर्दैव आड आलें<br>‘**कीं**’ नारद मध्यें आला ?<br>३. माझें बोलणें तुला आवडो<br>‘ **वा** ’ न आवडो.<br>४. गोविंदाला पाठव<br>‘ **अथवा** ’ माईला पाठव.<br>५. तो इंद्र, **कीं** चंद्र, **कीं** यम ! | ह्या दोन दोन वाक्यांमधले **किंवा, कीं, वा, अथवा** हे शब्द उभयान्वयी अव्ययें आहेत, हें स्पष्टच आहे; आणि ह्या शब्दांवरून दोन्ही वाक्यांतील गोष्टींच्या संग्रहाची अपेक्षा नसून, **दोहोंपैकीं एकी**चीच बोलणाऱ्यास अपेक्षा आहे, असें कळतें; (म्हणून ह्यांना “**विकल्पबोधक**” उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात.) |

ग

| | |
|---|---|
| १. अभ्यास केला,<br>‘**परंतु**’ उपयोग झाला नाहीं.<br>२. विद्वान् आहे,<br>‘ **पण** ’ आळशीही आहे.<br>३. लोहावरी तोय न उरतें,<br>‘**परी**’ नलिनीदलावरी उरतें. | ह्या वाक्यांतील जाड शब्दांवरून इच्छिलेल्या गोष्टींत कांहीं **कमीपणा** उत्पन्न झालेला आहे, असें कळून येतें; (ह्यामुळें ह्यांना “ **न्यूनत्वबोधक** ” उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात.) |

[ २ ]

ट

| | |
|---|---|
| १. बोलतां येत नाहीं,<br>‘ **कारण** ’ तो मुका आहे.<br>२. व वाचतांही येत नाहीं,<br>‘**कारण**’ तो आंधळा आहे.<br>३. तो विष प्याला,<br>**म्हणून** एकाएकीं मेला.<br>४. झाला अनंत वस्त्रें, ‘ **कीं** ’<br>तीस अनाथसें न वाटावें. | ह्या ठिकाणचे जाड शब्द पहिल्या वाक्यांतील गोष्टीचें दुसऱ्या वाक्यांत **कारण** सांगण्यासाठीं त्या दोन वाक्यांच्या मध्यें आले आहेत; (म्हणून या त्यांच्या अर्थावरून त्यांना “ **कारणबोधक** ” उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात. |

ठ

१. '**जर**' तहान लागली आहे,
'**तर**' पाणी कां पीत नाहींस ?
२. '**जरी**' सशक्त असलास,
'**तरी**' तुला हें उचलणार नाहीं.
३. (जर) तूं निघालास,
'**कीं**' (तर) मी निघालोच.
४. (जर) तूं आलास,
'**म्हणजे**(तर) मला उशीर नाहीं.

ह्या ठिकाणीं जाड अक्षरांतील शब्दांवरून कोणती गोष्ट कळून येत आहे बरें ? यांतील **जर–जरी** हे शब्द आरंभीं असलेल्या वाक्यांनीं केवळ **संकेत-गोष्ट** कळत आहे आणि **तर–तरी** व **कीं, म्हणजे,** हे शब्द आरंभीं असलेल्या वाक्यांनीं **संकेतावलंबी गोष्ट** कळत आहे. ( म्हणून ह्या दोघांनाही "**संकेतबोधक**" उभयान्वयी अव्ययें म्हणतात.)

ड

१. अश्व '**म्हणजे**' घोडा.
२. चार पैसे '**म्हणजे**' एक आणा.
३. रामा '**म्हणून**' एक मुलगा होता.
४. मी बघेन '**म्हणून**' तो म्हणाला.
५. तो म्हणाला '**कीं,**' मी थांबणार नाहीं.

ह्या ठिकाणच्या जाड अक्षरांतील शब्दांवरून पहिलीं वाक्ये व दुसरीं वाक्यें ह्यांच्या अर्थाचें **स्वरूप एकसारखें**च कळत आहे; ( म्हणून ह्यांना "**स्वरूपबोधक**" उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात.)

अशा रीतीनें उभयान्वयी अव्ययांचे अर्थाच्या दृष्टीनें भेद आढळतात. क्वचित् आणखी अर्थ उत्पन्न होत असल्यास तेही प्रकार होतील; परंतु ते निराळे सांगण्याची जरूर नाहीं. त्यांतील फरक आपल्या ध्यानांत आला म्हणजे पुरे.

   

आज कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. अर्थाच्या दृष्टीनें उभयान्वयी अव्ययांचेही निरनिराळे प्रकार आढळतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. उभयान्वयी अव्ययांच्या प्रत्येक प्रमुख भेदांत कोणते शब्द सामान्यतः आढळतात ?

२. एकच शब्द उभयान्वयी अव्ययाच्या अनेक भेदांत आढळतो काय ? असे कांही शब्द उदाहरणासहित सागा.

३. खालील वाक्यातील उभयान्वयी अव्ययांचा ह्या ठिकाणीं कोणत्या अर्थानें उपयोग होत आहे ?

( १ ) तूं आलास **म्हणजे** मी जाईन. ( २ ) अंबु **म्हणजे** पाणी. ( ३ ) वर्गात पहिला गोविंदा **कीं** रामा ? ( ४ ) तो म्हणाला **कीं** बाबा येणार नाहींत. ( ५ ) बाबा येणार नाहीत **म्हणून** तो म्हणाला. ( ६ ) पाऊस पडला **कीं** पीक येईल. ( ७ ) एवढ्याचकरितां आलों **कीं** तुम्ही मला नांव ठेवूं नये. ( ८ ) तो यावा **म्हणून** मी पत्र लिहिलें.

४. उभयान्वयी अव्ययें दोन शब्दही जोडितात काय ? कसे ?

---

# ११. शब्दयोगी अव्ययें

## [ १ ]

खालील शब्दयोगी अव्ययें काय काम करितात, तें पाहूं:—

घर + जवळ = घराजवळ. घोडा + पाशीं = घोड्यापाशीं.

हरि + करितां = हरीकरितां. तूं + विरुद्ध = तुजविरुद्ध.

| | |
|---|---|
| गुरु + पेक्षां = गुरूपेक्षां | मुलें + सवें = मुलांसवें. |
| बाग + पर्यंत = बागेपर्यंत | लाडू + साठीं = लाडवासाठीं. |
| सून + स्तव = सुनेस्तव | मन + मध्यें = मनामध्यें |

ह्या सर्व ठिकाणीं पहिल्या शब्दाला जोडून शब्दयोगी अव्ययें आलीं आहेत; परंतु तीं जोडिल्यावर काय फरक झाला आहे बरें ? तीं जोडिल्यावर दोन्ही शब्द जसेच्या तसे कायम न राहतां पहिला शब्द मात्र बदलला आहे; त्याचें "**सामान्यरूप**" झालेलें आपणांस दिसत आहे; अशा प्रकारचीं म्हणजे **सामान्यरूप करणारीं** हीं शब्दयोगी अव्ययें आहेत.

[ २ ]

आतां हीं शब्दयोगी अव्ययें कशीं आहेत बरें ? त्यांत वरच्या-पेक्षां काय निराळेपणा आहे ?

परवां त्यानें**च** पैसे चोरिले.
त्यानें परवां**च** पैसे चोरिले.
त्यानें परवां पैसे**च** चोरिले.
त्याने परवां पैसे चोरिले**च**.

ह्या ठिकाणीं 'च' हें अक्षर निरनिराळ्या शब्दाना जोडून आले आहे, तरी त्या मागल्या शब्दांना कांहीं फरक झालेला दिसून येत आहे काय ? येथे मागल्या शब्दांना कोणताच **फरक** झालेला दिसून येत नाहीं.

तसेच—

गरीब**देखील** सोन्याचे दागिने घालितात.
गरीब सोन्याचे**देखील** दागिने घालितात.

गरीब सोन्याचे दागिने**देखील** घालितात.
गरीब सोन्याचे दागिने घालितात**देखील.**
गरीब मुलीं**देखील** दागिने घालीत नाहींत.

ह्या ठिकाणीं 'देखील' हा शब्द दुसऱ्या शब्दांना जोडलेला आहे, व त्याच्या योगानेंही मागील शब्दांमध्ये कांहीं **फरक** झालेला दिसत नाहीं.

शिवाय असेंही आढळतें कीं, **च, ही, ना, मात्र, देखील, सुद्धां,** हे शब्द नाम, सर्वनाम, विशेषण, ह्यांनाच जोडून येतात असें नाहीं; तर वाटेल त्या शब्दाला जोडून येतात.

म्हणजे हे शब्द वाटेल त्या शब्दाला जोडून येणारे पण त्यांचे **सामान्यरूप न करणारे** आहेत; असें झालें. यांना "**शुद्धशब्दयोगी अव्ययें**" असें म्हणतात.

[ ३ ]

खालच्या शब्दयोगी अव्ययांचा काय उपयोग होत असावा बरें ? आपण शोधून पाहूं.

| | | |
|---|---|---|
| राम**ला** वंदन असो | किंवा | राम**प्रत** वंदन असो. |
| गाई**ला** चारा आण | ,, | गाई**करितां** चारा आण. |
| घ**रून** शाळा लांब आहे | ,, | घरा**पासून** शाळा लांब आहे. |
| रामा**हून** गोविंदा मोठा | ,, | रामा**पेक्षां** गोविंदा मोठा. |
| रामा**नें** वाघ मारिला | ,, | रामा**कडून** वाघ मारला गेला. |
| घ**रीं** माणसें आहेत | ,, | घरा**मध्यें** माणसें आहेत. |

ह्यांतील दोन्ही वाक्यांचे अर्थ एकच आहेत. एकाबद्दल दुसरें वाक्य घातलें तरी कांहीच अडचण नाहीं. मात्र एका ठिकाणीं नामाला विभक्तिप्रत्यय लागलेले दिसत आहेत; व दुसऱ्या ठिकाणी त्यांचे जागीं शब्दयोगी अव्ययें आलेलीं दिसत आहेत; म्हणजे **विभक्तीनें जें काम होतें, तेंच काम** हीं शब्दयोगी अव्ययें करीत आहेत; असें दिसून येतें.

[ विभक्ति-प्रत्यय जें काम करितात तेच शब्दयोगी अव्ययेही करितात; तर त्यात फरक काय असावा बरे ?

वर, खाली, मागें, पुढे, मध्ये, आंत, हे जसे शब्द आहेत, तसे स–ला–तें, ने–शी, हे शब्द आहेत काय ? त्याचप्रमाणें वर, खाली, ह्याचा जसा स्वतंत्र-पणे उपयोग होतो, तसा विभक्तिप्रत्ययांचा होतो काय ? वर, खाली, या शब्दांना जसा स्वतंत्र अर्थ आहे, तसा विभक्तिप्रत्ययांना कांही स्वतंत्र अर्थ आहे काय ? याचा विचार केल्यास आढळून येईल कीः—

| शब्दयोगी अव्ययें | विभक्तिप्रत्यय |
|---|---|
| ( १ ) हे शब्द आहेत. | ( १ ) हे शब्द नसून अक्षरें आहेत. |
| ( २ ) यांना स्वतःचा अर्थ आहे. | ( २ ) यांना स्वतःचा अर्थ नाहीं. ] |

   

आज आपण काय विचार केला ?

**१. शब्दयोगी अव्ययें दोन प्रकारचीं आढळतातः—( १ ) शब्द-योगी अव्ययें ( सामान्यरूप करणारीं ) व ( २ ) शुद्धशब्दयोगी अव्ययें ( सामान्यरूप न करणारीं ).**

**२. विभक्त्यर्थक शब्दयोगी अव्ययें ( विभक्तींचें काम करणारीं ) हीं मागील शब्दाचें सामान्यरूप करणारींच असतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. शब्दयोगी अव्यये विशेषतः किती प्रकारची आढळतात ?

२. **मध्यें, आंत,** हे शब्द स्वतंत्र येतात, तेव्हांही शब्दयोगीच असतात का ?

३. शुद्धशब्दयोगी अव्ययें कोणत्या शब्दाना जुळून येतात ?

४. नुसतीं शब्दयोगी अव्यये कोणत्या शब्दांना जुळून येतात ?

५. केव्हां केव्हां शब्दयोगी अव्यये विभक्तीचे काम करितात तें कसे ?

६. पेक्षां, करिता, प्रत, कडून, मध्यें, ही शब्दयोगी अव्यये कोणत्या विभक्तींचें कार्य करितात ? विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्यय यांत फरक काय ?

७. च, ही, ना, मात्र, देखील, सुद्धा, हीं कोणत्या प्रकारची शब्दयोगी अव्ययें आहेत ? यातील प्रत्येकाने काय अर्थ बहुधा कळतो ?

---

# १२. केवलप्रयोगी अव्ययें

मनाचे जेवढे निरनिराळे विकार तेवढे केवलप्रयोगी अव्ययांचे प्रकार होतील; हें आपणांस स्वाभाविकपणेंच दिसत आहे. ते निरनिराळे विकार दर्शविणारीं केवलप्रयोगी अव्ययें कोणतीं तीं आपण आतां निरनिराळीं काढून पाहूं.

**हर्षदर्शक**—वाः, वाहवा, ओहोहो, इ०.

**शोकदर्शक**—अरेरे, अयाई, हाय, हायहाय, शिवशिव, इ०.

**आश्चर्यदर्शक**—अबब, ओहो, इ०.

**प्रशंसादर्शक**—वाहवा, शाबास, भले, खाशी, यंव, मारू, फक्कड, ठीक, अच्छा, इ०.

**तिरस्कारदर्शक**—हट्, छे:, छट्, छी:, भलतेंच, धिक्, इश्श, थू:, इ०.

**विरोधदर्शक**—अहं, ऊंहूं, छट्, इ०.

**स्वीकारदर्शक**—जी, हां, हांजी, होय, हो, बरें, इ०.

**संबोधनदर्शक**—अरे, रे, अगे, गे, अहो, हो, गो, ग, इ०.

[ खालील वाक्यांतील शब्द पहा:—

( १ ) त्याची '**बरीक**' कमाल म्हणायची, मी '**बरीक**' वेडा.

( २ ) ऐसे नेणोचि गा करूं, जाण '**पै**' गा ।

( ३ ) धरूं ये सुखे चित्त '**पै**' जाणत्याचें.

ह्यांतील ठळक शब्दाप्रमाणें कांही शब्द आपल्या बोलण्यात किंवा कवितेंत येतात; त्याचा काहीं विशेष सागण्यासारखा अर्थ तेथे असतोच असें नाहीं. शिवाय ते शब्द अव्ययें आहेत; पण अव्ययाच्या इतर कोणत्याही प्रकारात त्याचा समावेश होऊं शकत नाही; म्हणून यांना ( **पादपूरणार्थक** ) केवलप्रयोगी अथवा **उद्गारवाचक अव्ययें** असे म्हणतात. ]

# १३. नामें

नामें जें काम करितात, तेंच काम नामें नसता, सर्वनामेंही त्या नामांच्याबद्दल येऊन बजावितात; हे आपल्याला माहीतच आहे. सर्वनामांशिवाय दुसरेही कांहीं मूळचे निराळ्या प्रकारचे शब्द असून ते नामांचें काम करितात कीं काय, तें आपण पाहूं.

| | | | |
|---|---|---|---|
| [च] कर धातूपासून | **करणें** | | हीं सर्व क्रियांचीं नांवें आहेत, |
| बोल | ,, | **बोलणें** | व तीं धातूंवरून साधलेलीं आहेत, |
| जा | ,, | **जाणें** | म्हणून त्यांना **धातुसाधित नामें** |
| अस | ,, | **असणें** | म्हणतात; हें आपल्यास मागेंच |
| नस | ,, | **नसणें** | माहीत झालेले आहे. तसेंच ह्या |
| हो | ,, | **होणें** | धातुसाधित नामांना सर्व विभक्ति |

लागतात, हेंही आपण पहातों. उदाहरणार्थः—

| | |
|---|---|
| प्र०—**बोलणें** | द्वि० व च०—**बोलण्यास** |
| तृ०—**बोलण्यानें** | पं०—**बोलण्याहून** |
| ष०—**बोलण्याचा** | स०—**बोलण्यांत** |

आतां खालील वाक्यें पहा व त्यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांवरून करणें, बोलणें, ह्यांच्याप्रमाणेंच काम होत आहे कीं नाहीं, तें विचार करून ठरवा.

[छ] १. तृ०—देशाटन **केल्यानें** चातुर्य येते.    २. तो **जेवल्यानें** तुझें पोट कसें भरेल ?

१. च०—काशीयात्रा **केल्याला** वर्ष झालें.  २. तो **जेवल्यास** त्याला दहीं वाढ.

१. पं०—यात्रा **केल्यापासून** मी कांदे सोडले.  २. मी **जेवल्यापासून** मला चैन पडत नाहीं.

१. ष०—चोरी **केल्याची** बातमी खोटी आहे.  २. गोविंदा **जेवल्याचें** मला माहीत नव्हतें.

ह्या ठिकाणीं कोणती गोष्ट आढळून येत आहे बरें? वरच्या मोठ्या अक्षरांतील शब्दांत मूळ शब्द कोणता ?

बोलण्यानें, बोलण्यास, बोलण्याहून, बोलण्याचा, बोलण्यांत; } यांत मूळ शब्द **बोलणें.**

करण्याने, करण्यास, करण्याहून, करण्याचा, करण्यांत; } यांत मूळ शब्द **करणें.**

मग—

देशाटन **केल्यानें** .... .... ( यांत मूळ शब्द **केलें** )

काशीयात्रा **केल्याला** .... .... ( यांत मूळ शब्द **केली** )

गोविंदा **जेवल्यापासून** .... .... ( यांत मूळ शब्द **जेवला** )

असें म्हणण्यास काय हरकत आहे? ह्या ठिकाणीं **केला, केली, केलें; जेवला, जेवली, जेवलें;** अशा धातुसाधित शब्दांना बऱ्याच विभक्तींचे प्रत्यय लागलेले स्पष्ट दिसत आहेत; म्हणून ‘ करणें, ’ ‘ बोलणें, ’ हीं जशीं धातुसाधित नामें आहेत, त्याचप्रमाणें ‘ केल्यानें, जेवल्यानें, ’ ह्यांतील मूळ शब्दही **“ धातुसाधित नामेंच ”** आहेत; असे म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

केल्यानें—"**केलें" धातुसाधित नाम,** नपुंसकलिंगी, तृतीयेचें एकवचन; तृतीयेचा अर्थ करण.

केल्याला— '**केली" धातुसाधित नाम,** स्त्रीलिंगी, चतुर्थीचें एकवचन

जेवल्यापासून—"**जेवला" धातुसाधित नाम,** पुल्लिंगी, पासून ह्या शब्दयोगी अव्ययामुळें एकवचनीं सामान्यरूप.

ह्याप्रमाणें ह्या शब्दाचें सगतवार व्याकरण सांगतां येतें. अशाच प्रकारचे आणखीही कांहीं शब्द आपल्यास आढळल्यास त्यांचीही संगति आपल्यास लावता येईल

   

आज कोणत्या गोष्टी कळल्या ?

**१. करणें, बोलणें, ह्यांप्रमाणच केला-केली-केलें, हे शब्द त्यांस विभक्तिप्रत्यय लागले असतां "धातुसाधित नामें" होतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. "**धातुसाधित नामें**" कोणत्या कोणत्या प्रकारची आढळतात ?

२. **केल्यानें** देशाटन, काशीस **गेल्याला,** नवग **पहाण्यास** मुंबईस गेलों, **निजण्यास** धोंडा व **खाण्यास** कोंडा, खरें **बोलल्यापासून** केव्हां केव्हां नुकसान होतें, पैसे **दिल्याची** पावती घेऊन ये; यांतील मोठ्या अक्षरातील शब्दांस नामें का म्हणावयाचें तें सांगा.

३. **केलें** व **दिलें;** या शब्दास सर्व विभक्ति लावून तशी योग्य वाक्यें लिहून आणा.

४. मला काम **करण्यास** वेळ नाही. (२) बाबांनीं ही पुस्तकें **विकण्यास** आणिलीं आहेत. यांतील जाड अक्षरांच्या शब्दाविषयीं कोणती गोष्ट आढळून येते ?

# १४. नामादिकांचीं लिंगें

—

मराठींत पुल्लिंगी व स्त्रीलिंगी शब्द कसे असतात, ह्याचा आपण मागें थोडा विचार केला. आतां त्या गोष्टी उजळणीसाठीं प्रथम ध्यानांत घेऊन, त्यांशिवाय आणखी ढोबळ अशा लिंगासंबंधानें सर्वसाधारणपणें लागू पडणाऱ्या कांहीं गोष्टी ठरवितां येतात कीं काय, तें पाहूं.

[ १ ] खालील शब्द पहा :—

| पुल्लिंगी शब्द | स्त्रीलिंगी शब्द | नपुंसकलिंगी शब्द |
|---|---|---|
| घोडा | घोडी | घोडें |
| बकरा | बकरी | बकरें |
| कुत्रा | कुत्री | कुत्रें |
| हा | ही | हें |
| असा | अशी | असें |
| चांगला | चांगली | चांगलें |
| करावा | करावी | करावें |

ह्या शब्दांवरून आपल्याला मराठींतील कांहीं पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगीं रूप व नपुंसकलिंगी रूप सामान्यतः कसें होतें, तें कळून येईल.

[ २ ] आतां खालील शब्द पहा:—

| पुल्लिंगी | स्त्रीलिंगी | पुल्लिंगी | स्त्रीलिंगी |
|---|---|---|---|
| सिंह | सिंहीण | कोळी | कोळीण |
| वाघ | वाघीण | गुरव | गुरवीण |
| सुतार | सुतारीण | दातार | दातारीण |
| व्याही | विहीण | पाटील | पाटलीण |

यांवरून कांहीं प्राणिवाचक पुल्लिंगी शब्दांचे स्त्रीलिंगी रूप मराठींत अशा प्रकारेंही होतें, हें आपल्या सहज ध्यानांत येईल.

[ ३ ] खालील शब्द पहा:—

| | | | |
|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री | राजा | राणी |
| नवरा | बायको | नर | मादी |
| मोर | लांडोर | बैल | गाय |
| पिता | माता | दीर | जाऊ |

ह्या शब्दांवरून कांहीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें मराठींत वरच्यापेक्षां निराळ्याच रीतीनें होतात, असें दिसून येईल.

[ ४ ]

| | | | |
|---|---|---|---|
| पोपट | पोपटी | हरीण | हरिणी |
| माकड | माकडी | गाढव | गाढवी |
| वानर | वानरी | देव | देवी |
| गोप | गोपी | दास | दासी |
| तरुण | तरुणी | हंस | हंसी |

ह्याप्रमाणें कांहीं पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप मराठींत आपणास आढळतें.

| | पुल्लिंगी | स्त्रीलिंगी | पुल्लिंगी | स्त्रीलिंगी |
|---|---|---|---|---|
| [ ५ ] | भगवान् | भगवती | बुद्धिमान् | बुद्धिमती |
| | गुणवान् | गुणवती | शीलवान् | शीलवती |
| | श्रीमान् | श्रीमती | सत्यवान् | सत्यवती |

ह्याप्रमाणें वरच्यासारख्या मराठींत येणाऱ्या संस्कृत पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप आढळतें.

तसेंच:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| [ ६ ] | बाल | बाला | अज | अजा |
| | प्रिय | प्रिया | कोकिल | कोकिला |

ह्याप्रमाणेंही कांहीं संस्कृत पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपे आढळतात. ( परंतु निव्वळ मराठींत **प्रिय** पुरुष, **प्रिय** स्त्री; **शांत** मुलगा, **शांत** मुलगी; अशींच रूपे आढळतात. )

[ ७ ] मराठींत कांहीं शब्दांचा उपयोग निरनिराळ्या लिंगींही आढळून येतो उदाहरणार्थ:—

| | |
|---|---|
| वेळ ( पु०, स्त्री० ) | तंबाखू ( पु०, स्त्री० ) |
| बाग ( पु०, स्त्री० ) | हरीण ( पु०, नपुं० ) |
| संधि ( पु०, स्त्री० ) | मजा ( पु०, स्त्री० ) |
| जन्म ( पु०, नपुं० ) | स्वप्न ( पु०, नपुं० ) |

पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप वर दिल्याप्रमाणेंच निरनिराळ्या प्रकारांनीं कां होतें ? आपली तसें बोलण्याची रीत म्हणून; हें आपण मागें पाहिलेंच आहे.

आज कोणत्या गोष्टींचा आपण विचार केला ?

**१. मराठींत येणाऱ्या पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी रूपें कशीं होतात, त्यांचे निरनिराळे कांहीं प्रकार शोधून पाहिले.**

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें द्याः—

मामा, काका, दादा, आजा; बेडूक, वानर, शूद्र, व्याघ्र; माळी, गवळी, भाट्या; टोपला, वडा, गुंडा; विद्वान्, सुंदर; क्षत्रिय, कर्ता, दाता; इन्द्र, इ०.

२. खालील स्त्रीलिंगी शब्दांची पुल्लिंगी रूपें द्याः—

साड, मेढी, सासू, मुरळी, कन्या, विधवा, म्हैस, शेळी, मॅडम, जाऊ, अशुभा, शांता, अन्या, ग्रंथकर्त्री, करवली, खळगी, खडी, पळी, विहीण, महिषी, काकी.

३. कावळा, गरूड, ग्रंथ, सोटा, हे शब्द पुल्लिंगी कां? घूस, चिमणी, पोथी, वीट, हे शब्द स्त्रीलिंगी कां? घुबड, पुस्तक, हे नपुंसकलिंगी कां?

४. खालील ठळक शब्दांची लिंगे सांगा—

(१) एके दिवशी रामचंद्र **बागांत** गेला. (२) नलराजा आपल्या नगराबाहेरील **बागेत** गेला. (३) गेली **वेळ** पुन: येणार नाही. (४) सकाळचा **वेळ** आम्ही **मजेत** घालविला. (५) काल पत्ते खेळताना मोठा **मजा** आला होता. (६) ही **संधि** घालवूं नका. (७) ह्यावेळी शत्रूशी **संधि** करण्यात शहाणपणा आहे. (८) कोपाने वदली न ती कटुवचें **शांता** सदा राहिली.

---

# १५. सामान्यरूप

| | |
|---|---|
| (क) मूल + स = मुलास<br>घोडा + ला = घोड्याला<br>(ख) मूल + कडून = मुलाकडून<br>घोडा + साठीं = घोड्यासाठीं | ह्या ठिकाणीं मूल ह्याचें 'मुला' व घोडा ह्याचें 'घोड्या' असें रूप झालेले आपल्यास आढळून येत आहे. |

(क) ह्या ठिकाणीं विभक्ति-प्रत्ययापूर्वीं हे **सामान्यरूप** झालेले दिसून येत आहे व (ख) ह्या ठिकाणीं शब्दयोगी अव्ययापूर्वीं हें **सामान्यरूप** झालेले आढळून येत आहे. यावरून असें दिसतें कीं, विभक्ति-प्रत्यय व शब्दयोगी अव्यय हीं लागतांना—हीं लागल्यामुळेंच—तीं ज्याला लागतात त्या शब्दाचें **सामान्यरूप** होत असावें.

(ग) आतां खालील मोठ्या अक्षरांतील शब्द पहा:—

**ह्या** मुलाच्या अंगांत ताप आहे
**भल्या** मनुष्यास चिडवूं नये
कृष्ण **गोपाळबाळां** जनांतें वदे

ह्या ठिकाणींही **हा, भला,** व **गोपाळबाळ,** ह्या शब्दांस विभक्ति-प्रत्यय लागले असतां जसें त्यांचें सामान्यरूप होतें, तसेंच रूप म्हणजे **सामान्यरूप** झालेलें आढळून येत आहे. हें कां झालें असावें बरें ? येथें ह्या शब्दांपुढें विभक्ति-प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय आलें आहे काय ?

असें दिसतें कीं, ह्या ठिकाणीं विभक्ति-प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय पुढें आलेले नसून, कोणत्या मुलाच्या ? **ह्या;** कोणत्या मनुष्यास ? **भल्या;** कोणत्या जनांतें ? **गोपाळबाळां** जनांतें; ह्याप्रमाणें **हा, भला** व **गोपाळबाळ,** ह्या शब्दांचा पुढील शब्दांशीं संबंध आहे; व त्या पुढच्या संबंधी शब्दांना विभक्तिप्रत्यय लागल्यामुळे किंवा त्या पुढच्या संबंधी शब्दांचें सामान्यरूप झाल्यामुळेही ह्या शब्दांचें उदाहरणांत दाखविल्याप्रमाणें **सामान्यरूप** झालें आहे.

ह्याप्रमाणें (१) **विभक्ति प्रत्ययांमुळें** (२) **शब्दयोगी अव्ययांमुळें** व (३) **पुढील सामान्यरूप असलेल्या किंवा विभक्त्यन्त संबंधी शब्दांमुळें;** अशा तीन कारणांनीं नाम, सर्वनाम व विशेषण ह्यांचीं सामान्यरूपें झालेलीं आढळून येतात.

   

आतां आपण कोणत्या गोष्टीचा विचार केला ?

**१. शब्दांचीं सामान्यरूपें कोणत्या कारणांनीं होतात, तें पाहिलें.**

### प्रश्न व गृहपाठ

१. खालील ठळक शब्दांची सामान्यरूपें कशामुळें झाली आहेत, तें सागाः— उज्जनी **शहरांत**, **त्याचा** स्वभाव, **एके** दिवशीं, **आपल्या** मित्रमंडळींस, **विनायकरावांनीं**, **पांथस्थाची**, पाय **धुण्यास**, **कसब्यामध्यें**, **शत्रूंकडे**;
जे कां ज्ञानें लाधले **सद्विचारा**, **संपत्तीचा त्यांपुढें**, काय तोरा ? **पद्माचा** जो तंतु तो **वारणाला**, **वारायाला** पै म्हणे सिद्ध झाला ! हा लाभ **पूर्वसुकृताविण** काय होतो ? **विद्येनेंच मनुष्या** आलें श्रेष्ठत्व **या जगामाजी.**

२. **मोठा** व **हा** या शब्दांचीं विभक्तीमुळें, शब्दयोगी अव्ययांमुळें व संबंधी शब्दांमुळें झालेली सामान्यरूपें धरून लिहून आणा.

---

## १६. विभक्तींचे अर्थ—उद्देश व विधान

[विभक्तीचे **उद्देश** व **विधान** हे दोन महत्त्वाचे अर्थ असल्यामुळे ते विद्यार्थ्यांच्या अवलोकनार्थ येथें दिले आहेत.]

### उद्देश

प्र०—**रामचंद्र** हा अयोध्येचा राजा होता.

द्वि०—**त्याला** म्हाताऱ्याला तुम्हीं उगीच कां छळतां ?

तृ०—**बिचारीनें** तिनें सगळें सोसून घेतलें !

च०—त्याला **गाढवाला** एवढेंही कळूं नये काय ?

ष०—सीता **त्याची** पित्याची शंका न धरी.

स०—हिरेजडित **सुंदरीं** कनकपंजरींही वसे.

वरच्या सर्व वाक्यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांचा त्यांच्यापुढील नामांकडे उद्देश आहे, तीं कोण हें **दर्शविण्या**करितां हे ठळक शब्द आले आहेत; ह्यामुळें ह्या प्रत्येक ठिकाणच्या निरनिराळ्या विभक्तींचा अर्थ " **उद्देश** " असें म्हणतात. ( **उद्देश** म्हणजे **दर्शविणें** असा अर्थ आहे. )

[ वरती जी उदाहरणें दिली आहेत, त्यात एकेकच विभक्ति नाहीं; अनेक विभक्ति आहेत; व अनेक विभक्तींचा एकाच अर्थी उपयोग होतो, हें आपल्यास माहीतच आहे. उदा०:—**कर्ता** हा अर्थ प्रथमा, तृतीया व चतुर्थी, इतक्या विभक्तींचा होतो; **करण** हा अर्थ तृतीया, चतुर्थी, पंचमी, ह्या विभक्तींचा आढळतो; **अधिकरण** हा अर्थ प्रथमा, तृतीया, चतुर्थी, सप्तमी, ह्या विभक्तींचा होतो. त्याचप्रमाणें येथेंही " **उद्देश** " हा अर्थ अनेक विभक्तींचा आहे. ]

[ शिवाय वरच्या उदाहरणांत ठळक अक्षरांतील शब्द नामेच आहेत, असे नाहीं; पहिल्या दोन उदाहरणांत **रामचंद्र** व **गाढवाला** हे शब्द नामें आहेत; पैकीं **गाढवाला** ह्या शब्दाचा उपयोग येथे विशेषणाप्रमाणे केलेला आहे; त्याचप्रमाणे **बिचारीनें** व **सुंदरीं** हे शब्द विशेषणे आहेत; व **त्याला** व **त्याची** हे शब्द मूळचे सर्वनामे असून, त्याचा येथे विशेषणाप्रमाणे उपयोग केलेला आहे. तसेंच ह्या सर्वांची पुढील नामाची जी विभक्ति तीच आहे; आणि ह्या सर्व शब्दाचा पुढील नामे कोण तें **दर्शविणें** हाच उपयोग असल्यामुळे, वरती दाखविल्याप्रमाणें "**उद्देश**" हा अर्थही अनेक विभक्तींचा असतो; असें म्हणणें भाग आहे. ]

## विधान

| | |
|---|---|
| १. तो **राजा** झाला. | २. तारामती **राणी** होती. |
| ३. मी **लुच्चा** नाहीं. | ४. तूं **शूर** आहेस. |

ह्या ठिकाणीं ठळक शब्दांपैकीं राजा व राणी हे शब्द नामें आहेत व लुच्चा व शूर हे विशेषणें आहेत; पण हे शब्द—सांगणें म्हणजे

विधान-पुरें करण्यासाठीं आले आहेत, हें उघडच आहे; व ह्या शब्दाची विभक्ति प्रथमा आहे, म्हणून ह्या शब्दांच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ " **विधान** " असे म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

ह्याप्रमाणे नाम, सर्वनाम व विशेषण ह्यांचा क्रियापदाशिवाय इतर शब्दांशीं वरील आणखी दोन " **उद्देश** " व " **विधान** " या प्रमुख नात्यांनीं विभक्तींच्या योगानें संबंध आढळतो. त्यांचे आणखी अनेक अर्थांचेही इतर शब्दांशीं संबंध आढळतील; परंतु त्यांचा विचार येथें करण्याची आवश्यकता नाहीं.

   

आतांपर्यंत कोणत्या गोष्टी आपणांस कळून आल्या ?

**१. उद्देश व विधान हे विभक्तींचे आणखी दोन प्रमुख अर्थ कळले.**

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यांतील ठळक शब्दाच्या विभक्तीचे अर्थ सांगाः—

(१) **नाना व मनीं हीं भावंडें** होती. (२) **नानानें मनीस** ढकलिलें, म्हणून **आई नानास** खूप रागावली. (३) कै० **गोखल्यांनीं शरीरानें, मनानें** व **पैशानें** देशासाठी **कष्ट** केले. (४) **हें पुस्तक मुलांना, मुलींना** व **शिक्षकांना**ही आवडलें. (५) **सज्जनांचें मन लोण्याहून** मऊ व **दगडाहून** कठीण असतें. (६) **थोरांचा समागम** व **राजाची सेवा हीं** फुकट जात नाहीत. (७) **कंसाला जळीं, स्थळीं, कृष्ण** दिसत होता. (८) **हा पंचा** सहा हात लांब आहे. (९) **मैलीं** दोन **पैसे भाडें** पडतें. (१०) **तो वेडा** आहे. (११) **तो कर्ण** आहे. (१२) मी **घरून** आलों.

२. करणार्थी तृतीया, अधिकरणार्थी चतुर्थी, विधानार्थी व उद्देशार्थी प्रथमा, संबंधार्थी षष्ठी, कर्मार्थी चतुर्थी, यांची दोन दोन उदाहरणें घरून लिहून आणा.

# १७. कांहीं सर्वनामें विशेषणें होतात व कांहीं विशेषणें नामें होतात

[ १ ]

खालील मोठ्या अक्षरांतील शब्दांत काय फरक आहे, तो पहा बरें?

| | |
|---|---|
| ( १ ) **जो** चोरी करितो | ( २ ) **जो** मुलगा चोरी करितो |
| ( १ ) **तो** शिक्षा भोगतो | ( २ ) **तो** मुलगा शिक्षा भोगतो |

ह्या ठिकाणीं **जो** व **तो** हे शब्द मुलगा ह्या नामाबद्दल त्याचे प्रतिनिधि म्हणून आले आहेत. म्हणून ते **सर्वनामें** आहेत; हें उघड आहे.

ह्या ठिकाणीं मुलगा हा शब्द प्रत्यक्ष पुढेच आहे, तेव्हां त्या नामाबद्दल **जो** व **तो** हे शब्द त्याचे प्रतिनिधि म्हणून आलेले दिसत नाहींत; त्या नामाचे वैशिष्ट्य दाखविण्यासाठीं ते आले आहेत; मग त्यांना 'सर्वनामे' म्हणतां येईल का ?

यांतील दुसऱ्या वाक्यांतील **जो** व **तो** यांना काय म्हणावें बरें ?

| | |
|---|---|
| **चांगला** मनुष्य. | **भला** मनुष्य |
| **काळा** मनुष्य. | **एक** मनुष्य |
| **असा** मनुष्य. | **असला** मनुष्य |
| **कोण** मनुष्य ? | **कोणता** मनुष्य |

येथे ठळक अक्षरातील सर्व शब्द मनुष्य **कोणता, कसा,** हें सांगत आहेत; म्हणून ते सर्व "**विशेषणें**" आहेत.

**हा** मनुष्य. **तो** मनुष्य
**जो** मनुष्य.

त्याचप्रमाणें हे ठळक शब्दही मनुष्य **कोणता** तेंच सांगत नाहींत का ? यांच्या पुढे लगेच नामही आहे; यावरून ते नामाबद्दल आले नसून, नामाचा एकप्रकारें ' गुण किंवा वैशिष्ट्य ' दाखविण्यासाठींच आले आहेत, हें उघड आहे. यामुळें ते **विशेषणें** आहेत; त्यांचा उपयोग अशा ठिकाणीं विशेषणांप्रमाणे झाला आहे; असें म्हणणें प्राप्त आहे.

म्हणजे असे दिसतें कीं, जेव्हां सर्वनामापुढें त्याचें नाम येतें, तेव्हां बहुधा त्या सर्वनामाचा उपयोग विशेषणांप्रमाणें होतो; म्हणून त्यांनाही ह्या ठिकाणीं **विशेषणेंच** म्हटले पाहिजे.

आणखी पहा:—

| [ येथील ठळक शब्द— **सर्वनामें आहेत.** ] | [ येथील ठळक शब्द— **विशेषणें आहेत.** ] |
|---|---|
| १ **जो** चढेल | १. **जो** मनुष्य चढेल |
| २. **तो** पडेल | २. **तो** मनुष्य पडेल |
| ३. **त्याला** इकडे आण | ३. **त्या** मुलाला इकडे आण |
| ४. फळे **हीं** फार पुष्टिकारक असतात. | ४. **हीं** फळें मुळींच पुष्टिकारक नाहींत. |
| ५. द्राक्षें **कोणाला** दिलींस ? | ५. **कोणाही** मुलाला दे. |
| ६. तुला **काय** हवें ? | ६. तुला **काय** वस्तु हवी ? |

[ २ ]

आतां खालील ठिकाणीं काय आढळत आहे, तें पहा:—

| | |
|---|---|
| १. **भल्याच्या** संगानें अवगुण असे तो गुण दिसे. | २. **भल्या** मनुष्याच्या संगतीनें अवगुण गुण वाटतो. |
| १. **मूर्खापुढें** वाचली गीता कालचा गोंधळ बरा होता. | २. **मूर्ख** मनुष्यापुढें गीता वाचली तरी काय उपयोग ? |
| १. **शहाण्यास** शब्दांचा मार पुरा होतो. | २. **शहाण्या** मनुष्यास शब्दांचें बोलणें पुरतें. |
| १. **आंधळ्यासी** जन **सारेची** आंधळे. | २. **आंधळ्या** मनुष्याला **सारींच** मनुष्यें आंधळीं. |
| ह्यांचे पुढें नाम नाहीं, तेव्हां ह्या विशेषणांना विशेषणेंच म्हणतां येईल का ? हे शब्द विशेषणांचेंच काम करितात का ? कीं दुसरे कांहीं काम करितात ? | ह्यांतील ठळक शब्द विशेषणेच आहेत, यांत शंका नाहीं; कारण तीं पुढील नामांचा साक्षात् गुणच दाखवीत आहेत; हें उघडच आहे. |

तेव्हां विचार केल्यास समजून येईल कीं, ज्याप्रमाणें पुढें नाम नसतां, सर्वनामें हीं नामांबद्दल येऊन त्यांचें सर्व काम बजावितात; त्याचप्रमाणें पुढे नाम नसतां, नामाचें सर्व प्रकारचें काम बजाविण्यासाठीं वरील पहिल्या वाक्यांतील विशेषणें उपयोगांत आलीं आहेत; म्हणून यांच्याप्रमाणें जीं विशेषणें आपल्याला नामांचे विभक्तिप्रत्यय लावून घेतात, व नामांप्रमाणेंच कर्ता–कर्मही वाक्यांत होतात, त्यांना ( तीं नामांचें सर्व प्रकारचें काम बजावितात म्हणून ) खरोखर **नामेंच** म्हणणे योग्य आहे; हें उघडच आहे.

   

आज काय कळलें ?

**१. केव्हां केव्हां सर्वनामें नामांचें वैशिष्ट्य दाखवितात, तेव्हां तींही विशेषणेंच होतात.**

**२. पुढें नाम नसतां, विशेषणांना विभक्तिप्रत्यय लागले कीं (चालू भाषेंत) तीं "नामें"च होतात.**

## प्रश्न व गृहपाठ

१. सर्वनामें केव्हां विशेषणें होतात ? त्यांना विशेषणे कां म्हणावें ?

२. खालील वाक्यांतील ठळक शब्द सर्वनामे आहेत कीं विशेषणें आहेत, तें घरून लिहून आणाः—

(१) **ते** बल्लवांचे बाळ वनी खेळती. (२) **तो** देव स्वभावें पाविजेतो. (३) **जो** गर्व वाहतो. (४) **त्याला** लगेच प्रायश्चित्त मिळतें. (५) **कोणी** घ्या भिगरी. (६) **कोणी** घ्या चेडू. (७) **कोणे** एके समयीं.

३. खालील वाक्यांतील ठळक शब्दांचें व्याकरण सांगाः—

(१) **खोट्याच्या** कपाळीं कुऱ्हाडीचा घाव. (२) **लहानाहून लहान** व्हावें. (३) **श्रीमंतांनीं गरीबांना** उगीच कां छळावें ? (४) **मोठ्यांच्या** भाडणांत आपण पडूं नये. (५) **श्रुतास** विनय भूषण आहे. (६) त्या **उभयतांचा** मी संभाळ करितों. (७) जे **महोन्नत परक्याचे** गुण वर्णितात. (८) **चार-चौघांना** बोलाव. (९) **शूराला** मरण तृणाप्रमाणें आहे.

४. पुढील ठळक शब्दांत फरक काय ? कां ?

(अ) **पुढच्यास** ठेच **मागला** शहाणा व **पुढच्या मनुष्यास** ठेच लागलेली पाहून **मागला मनुष्य** शहाणा होतो. (आ) **पांढऱ्यावर** काळे व **पांढऱ्या कागदावर** काळें. (इ) **चांगल्याला** कोण नांव ठेवील ? व **चांगल्या** मुलाला कोण नांव ठेवील ?

# १८. वर्ण व त्यांचे भेद

## [ १ ]

आपण वाक्या–वाक्यांनीं बोलतों; वाक्यांमध्यें शब्द असतात; शब्दांमध्यें अक्षरें असतात; **आई** ह्या शब्दामध्यें दोन अक्षरें आहेत, **घोडा** ह्या शब्दामध्यें दोन अक्षरे आहेत, **गवत** ह्यामध्यें तीन अक्षरें आहेत, **नारायण** ह्यांत चार अक्षरें आहेत. **खा, पी, ये, हा, जो, तो,** ह्यांत एक एकच अक्षर आहे; हें आपल्यास माहीतच आहे.

हीं सर्व अक्षरें मूळच्या एकेकाच उच्चाराचीं आहेत कीं त्या प्रत्येकामध्यें निरानिराळे उच्चार आपल्यास आढळून येतात, तें लक्षपूर्वक व पुनः पुनः उच्चार करून पहा बरें ?

'आई' ह्या शब्दांतील **'आ'** व **'ई'** ह्या प्रत्येक अक्षरांत एकेकच उच्चार आहे, त्यांत निरनिराळे एकापेक्षां ज्यास्त उच्चार आहेत, असें कांहीं पुनः पुनः उच्चार करून पाहूनही ध्यानांत येत नाहीं.

आतां घोडा ह्यांतील प्रत्येक अक्षराचा पुनः पुनः उच्चार करून पहा बरें ? त्या शब्दांतील **'घो'** व **'डा'** ह्या एकेका अक्षरांत एकापेक्षां ज्यास्त उच्चार आढळून येतात काय ? आपण लक्षपूर्वक पाहिलें, तर **'घो'** ह्या अक्षरामध्यें **'घ्'**चा एक उच्चार व **'ओ'**चा एक उच्चार, असे दोन उच्चार आपल्यास आढळून येतील; तसेच, **'डा'** ह्या अक्षरामध्यें **'ड्'**चा एक उच्चार व **'आ'**चा एक उच्चार, असे दोन उच्चार आढळून येतील.

ह्यावरून असें दिसतें कीं, आपल्या बोलण्यांत येणाऱ्या अक्षरांपैकीं **आ, ई,** अशीं कांहीं अक्षरें एकेकाच उच्चाराचीं आहेत; व **घो, डा,** अशीं कांहीं अक्षरें दोन उच्चारांमिळून झालेलीं आहेत.

आपल्याला क, का, कि, की, ह्याप्रमाणें सर्व बाराखड्या माहीत आहेत; त्यांतील अक्षरें कशीं होतात बरें ? विचार केल्यास आपल्यास आढळून येईल कीं:—

**क**—ह्यामध्यें ' क् ' व ' अ ' असे दोन उच्चार आहेत.

**का**—ह्यामध्यें ' क् ' व ' आ ' असे दोन उच्चार आहेत.

**कि**—ह्यामध्ये ' क् ' व ' इ ' असे दोन उच्चार आहेत.

ह्याप्रमाणे बाराखड्यांतील सर्व अक्षरें दोन उच्चारांमिळून झालेलीं असतात, असे दिसून येते.

म्हणजे असें झालें कीं, आपल्या बोलण्यांतलीं कांहीं अक्षरें मूळचींच एकेका उच्चाराचीं असतात; आणि काहीं अक्षरें मूळच्या अनेक उच्चारां-मिळून झालेलीं असतात. **अ**—मूळचा एकच उच्चार, **क**—मूळचे (क् व अ) दोन उच्चार, **क्र**—मूळचे (क्, र् व अ) तीन उच्चार, इ०.

[ २ ]

एक किंवा अनेक मूळच्या उच्चारांपासून जर अक्षरें होतात, तर आपल्या भाषेंत असे **मूळचे उच्चार** आहेत तरी किती ?

आपल्यास **मुळाक्षरें** माहीत आहेत, त्यांवरून आपल्या बोलण्यांत येणारे हे मूळचे उच्चार आपल्यास सहज सांगतां येतील; आणि त्यापैकीं निव्वळ एकेका स्वतंत्र मूळ उच्चाराचीं अक्षरें आणि मूळच्या दोन उच्चारांमिळून झालेलीं अक्षरें आपल्यास वेगळीं वेगळींही करून दाखवितां येतील. पहाः—

# एकंदर मूळ उच्चार किंवा मुळाक्षरें

| | |
|---|---|
| ( १ ) अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, *ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, | यांचा पुनः पुनः उच्चार करून पहा म्हणजे ध्यानांत येईल कीं, हे स्वतंत्रपणेंच होणारे मूळ उच्चार आहेत; यांना **स्वर** म्हणतात, हें आपल्यास ऐकून माहीतच आहे. |
| ( २ ) ं (नाकांतील उच्चार)<br>: (ह्कारासारखा उच्चार) | हे स्वरांचे अगोदर साह्य घेऊन होणारे उच्चार आहेत; हें विचार केल्यास आपल्यास कळून येईल. यांना अनुक्रमे **अनुस्वार** व **विसर्ग** असें म्हणतात, हेही आपल्यास ऐकून माहीतच आहे. (अ+ ं =अं), (अ+ : =अः) |
| ( ३ ) क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, व्, र्, ल्, ह्, श्, ष्, स्, ळ्, | हे स्वरांचें मागून साह्य घेऊन होणारे उच्चार; त्यांना **व्यंजनें** म्हणतात, हेंही आपल्यास ऐकून माहीत झालेलेच आहे. हेही आपल्या तोंडांतून निघणारे मूळ-चेच उच्चार आहेत; हे आपल्या ध्यानांत येईल. (क्+अ=क). |

* ॠ हा स्वर क्वचित् प्रसंगीं संस्कृतांत येतो.

ह्या सर्व मूळ उच्चारांना "**वर्ण**" असें नांव आहे. आपल्या भाषेतले वरचे सर्व मूळचे उच्चार मोजले, तर ते एकंदर ४९ आढळतात; त्यांत **स्वर १३, अनुस्वार** व **विसर्ग** मिळून २, आणि **व्यंजनें ३४.**

   

आज आपण कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. आपल्या भाषेंत अगदीं मूळचे उच्चार म्हणजे "वर्ण" किती आहेत, तें पाहिलें.**

**२. (१) स्वर, (२) अनुस्वार व विसर्ग, आणि (३) व्यंजनें, असे तीन प्रकारचे "वर्ण" आहेत.**

**३. वर्णांपासून अक्षरें होतात, अक्षरांचे शब्द बनतात व शब्दांच्या पूर्ण अर्थाच्या नीट जुळणीनें वाक्य होतें, हें कळलें.**

## प्रश्न व गृहपाठ

१. आपल्या बोलण्यांत मूळचे उच्चार कोणते येतात ? त्यांना काय नांव आहे ? राम, वायु, दु ख, यांतील प्रत्येक अक्षरात कोणते मूळ उच्चार आहेत ?

२. मूळच्या उच्चारात किती प्रकार आढळतात ? स्वर व व्यंजनें यांचे उच्चार कसे होतात ? एक व अनेक मूळ उच्चार ज्यांत आहेत, असे रोज चार चार शब्द घरून लिहून आणा.

३. अनुस्वार व विसर्ग यांचे उच्चार कसे होतात ?

४. एकदर आपल्या भाषेत मूळचे उच्चार म्हणजे **वर्ण** किती आहेत ? त्यांत **स्वर** किती ? कोणते ? **व्यंजनें** किती ? कोणतीं ?

# १९. संधि–१

[ १ ]

१. पंचम जॉर्ज बादशहा १९११ त "**सिंहासना**"वर बसले.

२. गिझनीच्या महंमुदानें सोमनाथाचें "**देवालय**" लुटिलें.

३. हल्लीं सकाळीं सहा वाजतां "**सूर्योदय**" होतो.

४. श्री "**गणेशा**"ला नमस्कार.

ह्या वाक्यांतून **सिंहासन, देवालय, सूर्योदय,** व **गणेश,** असे शब्द आले आहेत.

**सिंहासन** या एका शब्दांत सिंह व आसन असे दोन शब्द आहेत. **देवालय** या एका शब्दांत देव व आलय हे दोन शब्द आहेत. **सूर्योदय** या एका शब्दांत सूर्य व उदय असे दोन शब्द आहेत. **गणेश**–यांत कोणते दोन शब्द आहेत बरें ?

पहिले तीन शब्द कोणकोणत्या शब्दांमिळून झाले आहेत, हें आपल्यास साधारणपणें सांगता येते; पण **गणेश** हा शब्द कोणत्या दोन शब्दांमिळून झाला आहे, हें सांगण्यास जरा जड जातें नाहीं का ?

सिंह व आसन याचें 'सिंहआसन' असें न होतां **सिंहासन** असेंच कां होतें बरें ? देव व आलय यांचे 'देवआलय' असें न होतां **देवालय** असेच कां होतें ? त्याचप्रमाणें सूर्य व उदय यांचें 'सूर्यउदय' असें न होतां **सूर्योदय** असेच कां होतें ? आणि गण व ईश याचें 'गणईश' असें न होतां **गणेश** असेंच कां होतें ?

विचार केला तर असें कळून येईल कीं, " सिंह आसन," " सिंह-आसन," असा भराभर उच्चार करितां करितां **सिंहासन** असा उच्चार पक्का होऊन गेला; " देव आलय," " देवआलय," असें भराभर म्हणण्याच्या आपल्या रीतीमुळें **देवालय** असा शब्द पक्का होऊन बसला; " सूर्य उदय," " सूर्यउदय " असें जलद बोलतां बोलतां **सूर्योदय** झालें; व " गण ईश," " गणईश," म्हणतां म्हणतां **गणेश** असे झालें असावें.

[ २ ]

हें खरें दिसतें कीं, आपल्या भरभर बोलण्याच्या प्रवृत्तीमुळें असें होत असेल; परंतु असें होण्यांत काहीं ठराविकपणा आढळतो का ?

सिंह व आसन ह्याचे **सिंहासन** असें होतांना फरक कोठे झाला आहे, तो लक्षपूर्वक पहा बरें ? सिंह ह्या शब्दाच्या शेवटीं (ह्+अ) **अ** हें अक्षर आणि आसन ह्या शब्दाच्या आरंभीं **आ** हें अक्षर आहे; हीं दोन्हीं अक्षरें एक होऊन सिं'**हा**'सन असें म्हणजे अ व आ मिळून '**आ**' असें झालें आहे, हें आपल्या ध्यानांत येईल.

[ **क** ] आतां खालील ठिकाणीं पहिल्या शब्दांच्या शेवटीं कोणतीं अक्षरें आहेत, व दुसऱ्या शब्दांच्या आरंभीं कोणतीं अक्षरें आहेत, आणि दोहोंमिळून काय झालें आहे, तें नीट विचार करून पाहूं याः—

| | [पहिल्याच्या शेवटीं] | | [आरंभीं, दुसऱ्याच्या] | |
|---|---|---|---|---|
| मूळ व अक्षर=मू'**ळा**'क्षर | (येथें **अ** | व | **अ** | आहेत ) |
| सूर्य व अस्त =सू'**र्या**'स्त | (येथेंही **अ** | व | **अ** | आहेत ) |
| वस्त्र व अन्न =व'**स्त्रा**'न्न | (येथेंही **अ** | व | **अ** | आहेत ) |

यावरून **अ** व **अ** मिळून "**आ**" होतो, असें म्हणतां येणार नाहीं का ? आणखी पहा:—

| | [शेवटीं] | | [आरंभीं] | |
|---|---|---|---|---|
| दर्भ व आसन = द'**र्भा**'सन | (येथे **अ** | व | **आ** | आहेत) |
| फल व आहार = फ'**ला**'हार | (येथेंही **अ** | व | **आ** | आहेत) |
| दीप व आवलि = दी'**पा**'वलि | (येथेंही **अ** | व | **आ** | आहेत) |
| गंगा व अर्पण = गं'**गा**'र्पण | (येथें **आ** | व | **अ** | आहेत) |
| भाषा व अन्तर = भा'**षा**'न्तर | (येथेंही **आ** | व | **अ** | आहेत) |
| राजा व आज्ञा = रा'**जा**'ज्ञा | (येथें **आ** | व | **आ** | आहेत) |
| विद्या व आलय = वि'**द्या**'लय | (येथेंही **आ** | व | **आ** | आहेत) |

ह्या प्रत्येक ठिकाणीं '**अ**' किंवा '**आ**' अगोदर अथवा मागून कसेही आले, तरी त्या दोघांमिळून "**आ**" च होत आहे, असें आपल्यास दिसून येत आहे.

[**ख**] आतां खालील ठिकाणीं कोणतीं अक्षरे आहेत, व त्यांमिळून कोणतीं अक्षरे झालेली दिसत आहेत, पहा:—

| | [शेवटीं] | | [आरंभीं] | |
|---|---|---|---|---|
| हरि व इच्छा = ह'**री**'च्छा | (येथे **इ** | व | **इ** | आहेत) |
| अद्रि व इन्द्र = अ'**द्री**'न्द्र | (येथेही **इ** | व | **इ** | आहेत) |
| कवि व ईश्वर = क'**वी**'श्वर | (येथें **इ** | व | **ई** | आहेत) |
| देवी व इच्छा = दे'**वी**'च्छा | (येथें **ई** | व | **इ** | आहेत) |
| मही व ईश = म'**ही**'श | (येथें **ई** | व | **ई** | आहेत) |

वरच्या प्रमाणेंच ह्या प्रत्येक ठिकाणीं '**इ**' किंवा '**ई**' हीं अक्षरें

अगोदर किंवा मागून कशींही आलीं, तरी त्या दोघांमिळून "ई"च होते; असें आपल्यास दिसून येत आहे.

[ **ग** ] आतां खालील उदाहरणें पहा:—

भानु व उदय = भा'**नू**'दय ( येथें **उ** व **उ** आहेत )

गुरु व उत्सव = गु'**रू**'त्सव ( येथेंही **उ** व **उ** आहेत )

सु व ऊर्मि = '**सू**'र्मि ( येथें **उ** व **ऊ** आहेत )

म्हणजे '**उ**' किंवा '**ऊ**' हीं अक्षरेंही अगोदर किंवा मागून कशींही आलीं, तरी त्या दोघांमिळून "ऊ"च होतो, असें या उदाहरणांवरून दिसून येत आहे.

यावरून जर पहिल्या शब्दाच्या शेवटीं व दुसऱ्या शब्दाच्या आरंभीं **अ** किंवा **आ**, **इ** किंवा **ई**, **उ** किंवा **ऊ**, हीं अक्षरें म्हणजे हे स्वर आले, ( व ते दोन शब्द एकदम बोलायचे असले ) तर ते एकमेकांत मिळण्यांत वरीलप्रमाणें ठराविकपणा आहे; ते हवे तसे मिळत नाहींत; असें झालें.

दोन शब्द जलद जलद बोलण्याच्या आपल्या स्वभावामुळें, त्यांतील वरच्यासारखीं अक्षरें जेव्हां ठराविक रीतीनें एकमेकांत मिळून जातात, तेव्हां त्या अक्षरांच्या ह्या एकमेकांत मिळण्याला "**संधि**" असें नांव आहे.

**अ** किंवा **आ** एकमेकांत मिळाले, तर "**आ**"च होतो;

**इ** किंवा **ई** एकमेकांत मिळाल्या, तर "**ई**"च होते;

**उ** किंवा **ऊ** एकमेकांत मिळाले, तर "**ऊ**"च होतो;

एवढें आपल्याला वरच्या विचारावरून कळलें.

अ आ, इ ई, उ ऊ, हेच स्वर तेवढे एकमेकांत ठराविक रीतीनें मिळतात काय ? दुसरे स्वर मिळतात कीं नाहींत ? त्यांचे संधि होतात कीं नाहीत, त्याचा विचार पुढील पाठात करूं.

## प्रश्न व गृहपाठ

१. **संधि** कशाला म्हणतात ? **संधि** होण्याचे कारण काय ?

२. रामावतार, विद्यार्थी, देशान्तर, कार्यारंभ, कवीच्छा, मुनींद्र, हे शब्द कोणत्या दोन शब्दांपासून झाले आहेत ?

३. दुःख+आर्त, देव+आज्ञा, अद्रि+इंद्र, भू+उद्धार, स्व+अध्याय, नाना+आकृति, न्याय+अन्याय, अधि+ईश, उभय+अन्वयी, वस्त्र+अन्न, लघु+उत्तम, अल्प+आयु, इंदु+उदय, याचे संधि घरून लिहून आणा. (पितृ+ऋण यांचा काय संधि होईल ? )

---

# २०. संधि—२.

आपल्या जलद बोलण्याच्या प्रवृत्तीमुळें जवळजवळचे दोन वर्ण केव्हां केव्हां एकमेकांत मिळतात; आणि त्यांच्या मिळण्यांत नियमितपणा असतो; हें आपल्यास मागील पाठावरून माहीत झालें आहे.

[ **अ आ, इ ई, उ ऊ,** व **ऋ ॠ,** ह्या जोड्यांपैकी प्रत्येकांतील पहिल्या स्वराचा उच्चार दुसऱ्यांच्या मानानें आखूड व दुसऱ्यांचा उच्चार पहिल्यांच्या मानानें लांबट आहे; ह्यापेक्षां त्यांत आणखी कांही फरक नाहीं, हे आपल्यास माहीत आहे; म्हणून ह्या जोड्या-जोड्यांतील स्वरांना आपण एकाच जातीचे म्हणजे "**सजातीय स्वर**" असे म्हणूं; व ह्या जोड्यातील स्वरांहून जे

निराळे स्वर त्यांना ते उच्चाराच्या दृष्टीनें एकमेकांच्या जातीचे नाहीत, म्हणून "**विजातीय स्वर**" असें आपण म्हणूं; म्हणजे **अ** व **आ** हे "**सजातीय,**" पण **अ** व **ई** किंवा **इ** व **अ** किंवा **उ** व **इ** हे "**विजातीय स्वर.**"]

[ १ ] यावरून **सजातीय** स्वरांचा संधि त्यांच्याच दीर्घ स्वरांत होतो; हें आपल्यास पूर्वींच माहीत झालें आहे, असें म्हणतां येईल.

आतां **विजातीय स्वर** एकमेकांत कसे मिळतात, तें पाहूं.

[ २ ] खालील उदाहरणें पहाः—

**क**

| | संधि | | संधि |
|---|---|---|---|
| ईश्वर + इच्छा = ईश्वरेच्छा | **ए** | गण + ईश = गणेश | **ए** |
| यथा + इष्ट = यथेष्ट | **ए** | महा + ईश = महेश | **ए** |

**ख**

| | | | |
|---|---|---|---|
| सूर्य + उदय = सूर्योदय | **ओ** | गंगा + उत्सव = गंगोत्सव | **ओ** |
| समुद्र + ऊर्मि = समुद्रोर्मि | **ओ** | गंगा + ऊर्मि = गंगोर्मि | **ओ** |

**ग**

| | | | |
|---|---|---|---|
| देव + ऋषि = देवर्षि | **अर्** | राजा + ऋषि = राजर्षि | **अर्** |

ह्यावरून असें दिसतें कीं, अ किंवा आ ह्यांच्या पुढें इ ई, उ ऊ, ऋ, हे स्वर ऱ्हस्व किंवा दीर्घ कसेही आले, तरी त्यांच्याबद्दल अनुक्रमें **ए, ओ, अर्** होतात.

[ ३ ] आतां खालील उदाहरणें पहाः—

**ट**

| | | | |
|---|---|---|---|
| एक + एक = एकैक | **ऐ** | देव + ऐश्वर्य = देवैश्वर्य | **ऐ** |
| सदा + एव = सदैव | **ऐ** | सभा + ऐक्य = सभैक्य | **ऐ** |

| ठ | | संधि | | संधि |
|---|---|---|---|---|
| | जल + ओघ = जलौघ | औ | गंगा + ओघ = गंगौघ | औ |
| | बाल + औत्सुक्य = बालौत्सुक्य | औ | राजा + औदार्य=राजौदार्य | औ |

यावरून अ किंवा आ यांपुढें ए किंवा ऐ आले, तर 'ऐ'; व ओ किंवा औ आले, तर 'औ' होतो; असे दिसतें.

[ ४ ] खालील उदाहरणांत काय होत आहे बरें ?

च

| | | | |
|---|---|---|---|
| प्रीति + अर्थ = प्रीत्यर्थ | य | इति + आदि = इत्यादि | या |
| अति + उत्तम = अत्युत्तम | यु | अति + ऊर्मि = अत्यूर्मि | यू |
| किती + एक = कित्येक | ये | प्रीति + ऐक्य = प्रीत्यैक्य | यै |
| नदी + ओघ = नद्योघ | यो | देवी + औदार्य = देव्यौदार्य | यौ |

यावरून असें दिसतें कीं, ऱ्हस्व अथवा दीर्घ इ ई ह्यापुढे विजातीय स्वर आला, तर इ ई यांचा 'य्' होऊन, पुढील स्वर त्यांत मिळतो.

छ

| | | | |
|---|---|---|---|
| मनु + अंतर = मन्वंतर | व | मनु + आदि = मन्वादि | वा |
| मनु + इच्छा = मन्विच्छा | वि | मनु + ईश = मन्वीश | वी |
| अनु + एषण = अन्वेषण | वे | मनु + ऐश्वर्य = मन्वैश्वर्य | वै |
| मनु + ओघ = मन्वोघ | वो | मनु + औदार्य = मन्वौदार्य | वौ |

यावरून ऱ्हस्व अथवा दीर्घ उ ऊ ह्यांच्यापुढें विजातीय स्वर आला, तर उ ऊ यांचा 'व्' होऊन, पुढील स्वर त्यांत मिळतो; असें दिसतें.

| ज | संधि | | संधि |
|---|---|---|---|
| पितृ + अर्थ = पित्रर्थ | र | पितृ + आदि = पित्रादि | रा |
| पितृ + इच्छा = पित्रिच्छा | रि | पितृ + ईश = पित्रीश | री |
| पितृ + उत्कर्ष = पित्रुत्कर्ष | रु | पितृ + ऐश्वर्य = पित्रैश्वर्य | रै |
| पितृ + औत्सुक्य = पित्रौत्सुक्य | रौ | | |

येथे ऋ पुढें विजातीय स्वर आला असतां, ऋ चा 'र्' होऊन, पुढील स्वर त्यांत मिळतो; असे आढळून येते.

म्हणजे इ, उ, ऋ, यांचे पुढें विजातीय स्वर आल्यास, त्यांचे अनुक्रमें **य्, व्, र्,** होतात; व मग पुढील स्वर त्यांत मिळतो; असें म्हटलें पाहिजे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| [५] | ने + अन = नयन | **अय्** | गै + अन = गायन | **आय्** |
| | गो + ईश = गवीश | **अव्** | नौ + इक = नाविक | **आव्** |

ह्या उदाहरणांवरून ए ऐ व ओ औ ह्यांपुढें कोणताही स्वर आला असतां, त्याबद्दल अनुक्रमें **अय्, आय्** व **अव्, आव्,** असें होऊन, मग पुढील स्वर त्यांत मिळतात; असे दिसतें.

[ ह्या वरच्या अनेक उदाहरणांवरून एक गोष्ट साहजिकच ध्यानांत येते कीं, आपल्या नेहमींच्या बोलण्यात वरीलपैकीं जे शब्द येतात, ते बहुतेक संस्कृत शब्द आहेत; आणि म्हणून संधीच्या संबंधाने जो ठराविकपणा आपल्याला आढळून येतो, तो मराठींत येणाऱ्या संस्कृत शब्दांमधलाच विशेषतः आहे; म्हणजे हे संधींचे नियम पुष्कळ अंशीं संस्कृत शब्दांबद्दल आहेत; निव्वळ मराठी शब्दांतहीं याच नियमानी केव्हां केव्हां संधि होतात; पण केव्हा केव्हां निराळ्या रीतीनेंही होतात. बरेच संस्कृत शब्द आपल्या बोलण्यांत वारंवार येतात, म्हणून त्यांच्या संधींबद्दलची वरील माहिती आपल्यास कळणें अवश्यच आहे. ]

[ ६ ] आतां खालील निव्वळ मराठी शब्द पहा:—

| | |
|---|---|
| घर + ई = घरीं<br>पाय + आं = पायां<br>कर + ऊन = करून<br>घर + ऊन = घरून | येथें पहिल्या शब्दांतील शेवटचें अक्षर संधीमध्यें न राहतां पर म्हणजे दुसऱ्या शब्दांतील आरंभींचे अक्षर राहून संधि झाला |

आहे; व पहिल्याचा लोप झाला आहे याला पुढल्या शब्दांतील अक्षर कायम राहते, म्हणून "**पररूप संधि**" म्हणतात.

[ ७ ] तसेंच:—

| | |
|---|---|
| खिडकी + आंत = खिडकींत<br>कांहीं + असा = कांहींसा | येथें पहिल्या शब्दांतील अक्षर कायम राहून पुढील |

शब्दांतील अक्षराचा लोप झाला आहे; म्हणून याला "**पूर्वरूप**" **संधि** म्हणतात.

याप्रमाणें सर्व सजातीय स्वर व विजातीय स्वर एकमेकांत कसे मिळतात, याचा म्हणजे "**स्वर-संधीं**"चा आतांपर्यंत आपण विचार केला.

## प्रश्न व गृहपाठ

१. पुढील शब्दांचे **संधि** करून दाखवा:—

स्वकृत + उपकार, स्व + अर्थ, खड्ग + अग्र, हिम + आलय, हृदय + अंतरीं, धनद + ईश, वर्षा + ऋतु, श्रीवामन + एकपद, देव + ऋषि, परम + अर्थ, वि + अर्थ, गर्व + उद्धत, लोभ + आविष्ट, कुल + उद्भव, प्रताप + उत्कर्ष,

मृग + उत्तम, अघ + आलि, नद् + आदिक, स्थिति + अंतर, अति + अंत, गिरि + ईश्वर, कदा + अपि, परम + ईश्वर, पर + उपकार, युक्त + आहार, प्रति + अक्ष, स्थान + ईश्वर, राज्य + अभिषेक, स्पर्श + इंद्रिय, संपत्ति + उत्पादन, विजय + उत्साह, रथ + उपस्थ, अद्रि + इंद्र, न + असे, शंकु + आकार, वि + अवस्था, न + उघडणे, मांस + ओदन, तथा + एव, केलें + असें, इ०.

२. पुढील शब्दांचे संधि कसे झाले आहेत, ते सांगाः—

नास्तिक, राजर्षि, अत्युच्च, सह्याद्रि, झाडीतून, तथापि, व्यायाम, नानाकृति, स्वोच्छिष्ट, लोकोत्तर, व्यवस्था, हितोपदेश, ब्रह्मर्षि, उत्तमोत्तम, मध्यमाधम, शक्त्यनुसार, सृष्ट्यवलोकन, एकैक, गंगोदक, उभयान्वयी, महोन्नत.

---

# २१. समास

## [ १ ]

आपण केव्हां केव्हां—

१. "राजाचा वाडा" न म्हणतां **राजवाडा** असें म्हणतों.

२. "विद्येकरितां गृह" न म्हणतां **विद्यागृह** असे म्हणतों.

याचें कारण काय असावे बरें? वरच्या उदाहरणांवरून हें ध्यानांत येईल कीं, राजाचा व वाडा हे दोन शब्द एकदम म्हणतेवेळीं मधलें '**चा**' हें अक्षर गाळलें आहे. त्याचप्रमाणें "विद्येकरितां गृह" एवढें लांबट न म्हणतां, त्या दोहोंमिळून अर्थ एकदम बोलतेवेळीं त्यांच्या मधला '**करितां**' हा शब्द गाळून टाकिला आहे. तथापि "राजाचा वाडा" या दोन शब्दांच्या

अर्थांत व **राजवाडा** या एका शब्दाच्या अर्थांत कांहींच फरक नाहीं. तसेंच 'विद्येकरितां गृह' व "**विद्यागृह**" ह्यांच्याही अर्थांत कांहीं फरक नाहीं आणखी—

| | |
|---|---|
| १. "निळा आहे कंठ ज्याचा तो" असें न म्हणतां आपण— | **नीलकंठ** म्हणतों. |
| २. "दश आहेत आननें ज्याला तो" असें न म्हणतां आपण— | **दशानन** म्हणतों. |

येथेंही किती तरी शब्द ज्यास्त बोलावे लागतात, ते न बोलतां लांबट अर्थ थोडक्यांत वरील एका शब्दानेंच व्यक्त केला आहे. **नीलकंठ** व **दशानन** ह्या सुटसुटीत शब्दांनीं ज्यांच्याबद्दल बोलावयाचें त्या **शंकरा**चा व त्या **रावणा**चा एकदम बोध होत आहे; आणि तसें करूनही वरचें लांबट बोलणें व खालचे सुटसुटीत शब्द, यांच्या अर्थांत मुळींसुद्धां फरक नाहीं.

यावरून असें दिसतें कीं, ज्याप्रमाणें आपल्या जलद बोलण्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीमुळें जवळ जवळ आलेल्या दोन शब्दांमधील एकमेकांत मिळण्याजोगे **वर्ण** एकमेकांत मिळून त्यांचे **संधि** होतात; त्याचप्रमाणें, थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ यावा, ह्या आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीमुळें दोन शब्दांमधील विभक्तिप्रत्यय किंवा आणखी दुसरे शब्द गाळून, ते दोन शब्द आपण एकत्र करितों व त्यांचा एक शब्द बनवितों; ह्या दोन शब्दांच्या एकीकरणाला "**समास**" असें नांव आहे.

[ २ ]

ह्या "**समासां**" मध्यें कोणत्या गोष्टी प्रामुख्यानें आढळून येतात, त्यांचा आतां विचार करूं.

**क**

| | |
|---|---|
| १. **प्रति**वर्ष, **दर**रोज, <br> २. **यथा**न्याय, **यथा**शास्त्र, <br> ३. घरोघर, गांवोगांव, | यांतील पहिल्या चार उदाहरणांत सामान्यतः समासांतील दोन शब्दांपैकीं पहिल्या शब्दां- |

वर जोर असून, तोच शब्द **प्रमुख** आहे असें वाटतें; त्याचप्रमाणें वरील प्रत्येक शब्द क्रियेची **वेळ** व **ठिकाण** दाखविणारे असल्या-मुळें, हे सर्व शब्द **क्रियाविशेषण अव्ययें** आहेत; हेंही उघडच आहे.

यांना **पहिलें पद मुख्य** असतें, म्हणून **प्रथमपदप्रधान** किंवा हे शब्द क्रियाविशेषण अव्ययें असतात, म्हणून "**अव्ययीभाव**" समास असें म्हणतात.

**ख**

१. कमल**मुख**, काळ**मांजर** (कमलाप्रमाणें **मुख**, काळें असें **मांजर**)
साखर**भात**, भोजन**भाऊ** (साखरेनें युक्त **भात**, भोजनापुरता **भाऊ**)
२. ईश्वर**निर्मित**, गाय**रान** (ईश्वरानें **निर्मित**, गाईकरितां **रान**)
रोग**मुक्त**, गर्भ**श्रीमंत** (रोगापासून **मुक्त**, गर्भापासून **श्रीमंत**)
राज**आज्ञा**, केळ**फूल** (राजाची **आज्ञा**, केळीचे **फूल**)
कूप**मंडूक**, वन**भोजन** (कूपातील **मंडूक**, वनांतील **भोजन**)

ह्या ठिकाणीं कसें **मुख**, कसें **मांजर**, कसा **भात**, कोणीं **निर्मित**, कशाकरितां **रान**, कशापासून **मुक्त**, कोणाचें **फूल**, कोणता **मंडूक**, इ० समासांतल्या दुसऱ्या शब्दाला प्राधान्य देऊन, त्याच्याविषयींच मुख्यत: बोलावयाचें आहे, असें दिसतें; व ते बोलतांना त्या दोन शब्दांमधील विभक्तिप्रत्यय किंवा दुसरे कांहीं शब्द गाळले आहेत; असें आढळतें.

यावरून ह्या प्रकारच्या समासांना **द्वितीयपदप्रधान** किंवा "**तत्पुरुष**" **समास** असें म्हणतात.

कमल**मुख**, कमल**नेत्र**, (कमलाप्रमाणें **मुख**, कमलाप्रमाणें **नेत्र**)
विद्या**धन**, विद्युल्**लता**, (विद्या हेच **धन**, विद्युत् हीच **लता**)
महा**देव**, तांबड**माती**, (महा असा **देव**, तांबडी अशी **माती**)
सु**वासना**, कु**योग**, (सु अशी **वासना**, कु असा **योग**)

ह्या ठिकाणींही **मुख**, **नेत्र**, **धन**, **लता**, **देव**, **माती**, इ० समासांतील दुसऱ्या शब्दांबद्दलच मुख्यत: बोलावयाचें आहे, हें उघडच आहे; म्हणून हेही **द्वितीयपदप्रधान** किंवा **तत्पुरुष** समासच आहेत. परन्तु यांतील कांहीं शब्दांत विशेषण व विशेष्य किंवा उपमान व उपमेय हीं आढळून येत आहेत; यांना "**कर्मधारय**" असें फार प्रचारांतलें नांव आहे, तें ध्यानांत ठेवावयास हवें. ह्या प्रकारचा संबंध असलेल्या शब्दांचा "**कर्मधारय**" समास असतो.

**ग**

१. रामकृष्ण, हरिहर, (**राम** व **कृष्ण**, **हरि** व **हर**)
२. न्यायान्याय, खरेंखोटें, (**न्याय** किंवा **अन्याय**, **खरें** किंवा **खोटें**)

३. भाजीपाला, घरदार, (**भाजी, पाला व इतर; घर, दार व इतर**)

ह्या समासांत जे दोन शब्द आहेत, त्या दोहोंहीबद्दल मुख्यतः बोलावयाचें आहे, असें आढळून येतें; आणि यांच्यामधील **'आणि,' 'व,'** हे शब्द गाळले गेले आहेत. अशा समासांना **उभयपदप्रधान** किंवा "**द्वंद्व**" समास असें नांव आहे.

## घ

१. चतुर्मुख (चार आहेत मुखें ज्याला तो; **ब्रह्मदेव**)
२. जितेंद्रिय (जित आहेत इंद्रियें ज्याने तो; **शुकाचार्य**)
३. गतधैर्य (गेलें आहे धैर्य ज्यापासून तो; **उत्तर**)
४. मानधन (मान हेंच आहे धन ज्याचें तो; **विश्वामित्र**)
५. भीमादि (भीम आहे आदि ज्यांमध्यें ते; **योद्धे**)

ह्या ठिकाणीं चतुर् किंवा मुख, जित किंवा इंद्रिय, गत किंवा धैर्य, इत्यादिकांबद्दल कांहीं बोलावयाचें नसून, त्यांपासून ज्यांचा बोध होतो, अशा निराळ्याच गोष्टींबद्दल मुख्यतः बोलावयाचें आहे, असें कळून येते; व या ठिकाणींही किती तरी ज्यास्त शब्द बोलावे लागतात, ते गाळले आहेत; म्हणून ह्या समासाला **अन्य-पदप्रधान** किंवा "**बहुव्रीहि**" समास असें नांव आहे.

   

[ वरतीं समासाच्या अर्थाची फोड करून दाखविली आहे, त्याला समासाचा "**विग्रह**" असें म्हणतात. ]

[ समास दोनच शब्दांचा होतो. अनेक समासांमिळून अनेक शब्द एकत्र झाले, तर तो एक सामासिक शब्द होतो. त्यांतील पहिल्या दोन शब्दाचा एक समास, पहिले दोन व तिसरा शब्द ह्यांचा एक समास, पहिले तीन व चवथा ह्यांचा एक समास, ह्याप्रमाणें सामान्यतः क्रमानें सामासिक शब्दांतील समास सांगतात. ]

## प्रश्न व गृहपाठ

१. **समास** म्हणजे काय? **सामासिक शब्द** कशाला म्हणावें ?

२. समासाचे मुख्य प्रकार कशावरून पडतात ? त्याची नावे काय ?

३. **कर्मधारय** समास हा कोणत्या समासातला भाग आहे ? तो कसा ओळखावा ?

४. पुढील **समास** सविग्रह सांगाः—

गुणावगुण, सदाचारी, सुशिक्षित, बरेंवाईट, सहानुभूति, स्वदेश, देशबांधव, भास्कराचार्य, गणिताध्याय, भाषान्तर, स्मरणशक्ति, यथास्थित, इतिहासवाचन, गुणदोष, अनेकविध, धर्मादि, मेघराज, चमत्कारविशेष, बाळडोंगर, जगन्नियंता, सर्वशक्ति, भजनपूजन, उत्तममध्यमाधम, मृगोत्तम, सुनीतिपथ, स्वकृतोपकारविभव, विषमव्रत, हिमधूसर, भरतवर्ष, तज्जरठसंस्थित, सत्संग, देवर्षि, द्रोणद्रौणिकृपादि, महागद, पूरितलोककाम, कटकमुकुटादिक, इ०.

# २२. वाक्य व वाक्यांश

| | |
|---|---|
| (१) मी पुस्तकांत **पाहून** तुला उदाहरण सांगेन. | (२) मी पुस्तकांत **पाहीन** व तुला उदाहरण सांगेन. |

| | |
|---|---|
| ( १ ) तुम्ही **बोलतांना** फार अडखळतां. | ( २ ) तुम्ही **बोलतां** तेव्हां फार अडखळतां. |
| ( १ ) आगगाडींत **पाहिलेला** मनुष्य आज दिसला. | ( २ ) जो आगगाडींत **पाहिला** तो मनुष्य आज पुनः दिसला. |
| ( १ ) तो दांत-ओठ **खात** माझ्या अंगावर आला. | ( २ ) त्यानें दांत-ओठ **खाल्ले** व तो माझ्या अंगावर आला. |

ह्यांतील पहिल्या व दुसऱ्या ठिकाणीं काय फरक आहे बरें ?

| | |
|---|---|
| हें सर्व एकएकच वाक्य आहे | या प्रत्येकांत दोन दोन वाक्यें आहेत. |
| यांत एक धातुसाधित शब्द आहे व शेवटीं एकच क्रियापद आहे. | यांत धातुसाधित अपूर्णक्रिया-वाचक शब्द नसून, दोन क्रियापदें आहेत. |

तथापि ह्या दोन्ही ठिकाणच्या अर्थांत कांहींच फरक नाहीं. ह्यावरून असें दिसतें कीं, वाक्यांत नुसते धातुसाधित शब्द आल्यास, त्यांच्यायोगानें काहीं वाक्य होत नाहीं. वाक्य होण्यास वाक्यांत क्रियापद (प्रत्यक्ष किंवा अध्याहृत) असणेंच अवश्य आहे.

धातुसाधित शब्द व क्रियापदें हीं दोन्ही धातूंपासूनच होतात; ह्यामुळें जेथें धातुसाधित असेल, तेथें क्रियापद येऊं शकेल; व जेथें एकाद्या वाक्याच्या पोटांत क्रियापद असेल, तेथें त्या क्रियापदाबद्दल धातुसाधित घालून, त्या तशा दोन वाक्यांमिळून एक वाक्य करितां येऊं शकेल.

उदाहरणार्थः—

| | |
|---|---|
| (क) मी त्यास भेटण्याकरितां त्याच्या घरीं गेलों. | (क) मी त्यास भेटावें, म्हणून त्याच्या घरीं गेलों. |
| (ख) लोकरंजनाचा हेतु धरून कवि काव्य करितात. | (ख) कवि लोकरंजनाचा हेतु धरितात व काव्य करितात. |
| (च) वॉशिंग्टन आला, तेव्हां सर्व उभे राहिले. | (च) वॉशिंग्टन येतांच, सर्व उभे राहिले. |
| (छ) जो धूर्त असतो, तो सहसा फसत नाहीं. | (छ) धूर्त असलेला मनुष्य सहसा फसत नाहीं. |

ह्याप्रमाणें हे दोन्ही प्रकार एकच अर्थ व्यक्त करणारे आहेत; यांपैकीं कोणत्याही तऱ्हेने बोलल्यास अर्थांत थोडासुद्धां कमीपणा येत नाहीं, असें आपल्यास कळून येईल एकाद्या वाक्यांत अनेक धातुसाधित शब्द असले, तरी त्या प्रत्येकाच्या बद्दलही क्रियापद घालून, त्या अनेक वाक्यांमिळून असें वाक्य बनवितां येईल. उदाहरणार्थः—" मीं स्नान **केलें**, धोतर **धुतलें**, **जेवलों** व शाळेंत गेलों " ह्याऐवजीं " मी स्नान **करून**, धोतर **धुवून**, व जेवण **आटपून**, शाळेंत गेलों " असेंही म्हणतां येईल.

म्हणजे असें दिसतें कीं, हे अपूर्णक्रियावाचक शब्द किंवा धातुसाधितें वाक्यांत जेथें जेथें असतात, तेथें तेथें पूर्ण वाक्य न होतां, वाक्याचा एक भाग किंवा तुकडा तयार होतो; आणि जरूर तर त्या धातुसाधितांच्याबद्दल क्रियापदें घालून, त्या वाक्याच्या तुक-

ड्यांचेंच एकेक वाक्यही बनवितां येतें. अशा प्रकारच्या धातुसाधितें असलेल्या वाक्यांतल्या तुकड्यांना "**वाक्यांश**" असें म्हणतात.



यावरून आज आपणांस काय कळतें ?

**१. वाक्यांत धातुसाधितें असल्यास त्यांच्याशीं संबंध असलेल्या शब्दांसहित जो वाक्यांत एक भाग पडतो, त्याला "वाक्यांश" म्हणतात.**

**२. धातुसाधितांच्याबद्दल क्रियापदें घालून वाक्येंही बनवितां येतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. "**वाक्य**" व "**वाक्यांश**" ह्यांत फरक काय ?

२. खालील तिसऱ्या प्रश्नांतील "**वाक्यें**" व "**वाक्यांश**" ओळखा.

३. पुढील वाक्यांशांचीं वाक्यें व वाक्यांचे वाक्यांश करून, लिहून आणाः—

( १ ) जमीन नांगरीत **असतां**, (२) रामानें धनुष्य सज्ज **करीत**, (३) खोटें **बोलणारा** मनुष्य मला आवडत नाहीं. ( ४ ) अंगीं नम्रता **नसणें** हें कांही चांगलें नव्हे. ( ५ ) ती गंगाबाई दुथड्यांचे उल्लंघन **करून**, तट्ट **फुगून**, गाऱ्हाणें **सांगण्या**करितां रत्नाकराकडे जात आहे. ( ६ ) सीता सुख-उमाळा **धरूनि** त्या लोकपाळा लक्षिती झाली. ( ७ ) आम्रा त्या पिक **सेवितां** समसमां संयोग की जाहला. ( ८ ) ज्ञानेश्वराचें चरित्र **देऊन** त्याची योग्यता सांगा. ( ९ ) सारा टेंभा माईसाहेबांचा व त्यांनी **जमविलेल्या** साळकाया-माळकायांचा. ( १० ) रामाला वनवासास **पाठविल्यावर** भरतानें फार शोक केला.

---

# २३. वाक्याचे प्रकार

[ १ ]

शब्दांची नीट रीतीनें जुळणी करून, त्यापासून जर कांहीं पूर्ण अर्थ कळत असेल, तर तशा प्रकारच्या **पूर्ण अर्थाच्या शब्दांच्या जुळणीला वाक्य म्हणतात;** हें आपल्याला माहीतच आहे. अर्धवट अर्थ कळत असेल, तर त्या शब्दसमूहाला कांहीं **वाक्य** म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थः—"रामा बोलला" हें वाक्य आहे; "रामाने बोलून" हें वाक्य नाहीं.

आतां खालील ठिकाणीं आपल्या बोलण्याचा पूर्ण अर्थ केवढ्या बोलण्यानें कळत आहे व केवढ्यानें कळत नाहीं, तें पहा बरें ?

| | |
|---|---|
| १. जो चोरी करितो, | २. जसें करावें, |
| ३. जेव्हां बाबा रागावतील, | ४. ज्याला आंबे पाहिजेत, |

एवढ्या बोलण्यानें, बोलणाराला जें सांगावयाचें आहे, तें पूर्णपणें सांगितलें गेलें आहे कीं त्या बोलण्यांत अर्धवटपणा आहे ? त्याला आणखी पुढें कांहीं सांगावयाचें आहे ?

विचार केल्यास आपल्या सहजच ध्यानांत येईल कीं, वरच्या शब्दसमूहानें कांहीं बोलणाराच्या मनांतला अर्थ पूर्ण व्यक्त होत नाहीं; त्याला आणखी पुढें कांहीं सांगावयाचें आहे असें वाटतें; त्याचें बोलणें तेवढ्या शब्दांनीं पूर्ण झालें नसून, अर्धवट राहिलें आहे; असें स्पष्ट कळतें.

आतां खालीलप्रमाणें म्हटलें, तर बोलणें पूर्ण कळतें कीं तें अर्धवट राहिलें आहे असे वाटतें, पहा बरें ?

| | |
|---|---|
| १. जो चोरी करितो,<br>त्याला शिक्षा होते. | २. जसें करावें,<br>तसें भरावें. |
| ३. जेव्हां बाबा रागावतील,<br>तेव्हां मधू औषध घेईल. | ४ ज्याला आंबे पाहिजेत,<br>त्यानें हात वर करावे. |

उघडच आहे कीं, वरचें बोलणे अर्धवट वाटतें; पण वरच्या बोलण्यास जोड देऊन बोललेलें खालचें बोलणें पूर्ण वाटतें; त्यांत अर्थाचा अपुरेपणा वाटत नाहीं; यावरून ( १ ) " जो चोरी करितो, त्याला शिक्षा होते; " ( २ ) " जसे करावें, तसें भरावें; " ( ३ ) " जेव्हां बाबा रागावतील, तेव्हां मधू औषध घेईल; " आणि ( ४ ) " ज्याला आंबे पाहिजेत, त्यानें हात वर करावे; " एवढें एकेक **पूर्ण अर्थाचें बोलणें** आहे, म्हणून तें **एकेक वाक्य** आहे; असें झालें.

आतां " जो जोरी करितो त्याला शिक्षा होते " एवढें जर **एक वाक्य** आहे, तर ' जो चोरी करितो ' एवढ्याला वाक्य म्हणावयाचें नाहीं का ? येथें हें ध्यानांत घ्यावयास पाहिजे कीं, ' जो चोरी करितो ' हेंही वाक्य आहे खरें, पण त्या वाक्यानें बोलणाराचें म्हणणें किंवा त्याच्या बोलण्याचा अर्थ सर्वस्वीं पुरा कळत नसल्यामुळें, तें मुख्य बोलण्याच्या पोटांतलें बोलणें किंवा पोटांतलें वाक्य असलें पाहिजे; हें उघड आहे. यावरून असें दिसतें कीं, केव्हां केव्हां एका वाक्यांत कांहीं पोटवाक्येही येतात. अर्थात् बोलणा-

रास जी गोष्ट मुख्यत: सांगावयाची असते, ती सांगणारें वाक्य ते "**मुख्य वाक्य**" व त्याच्या पोटांतलें वाक्य तें वाक्यच; पण मुख्य नाहीं असें, पोटांतलें, **पोटवाक्य** किंवा "**गौणवाक्य**" होय; व त्या दोन्ही वाक्यांमिळून सर्व **एक वाक्य** होय.

[ २ ]

| | |
|---|---|
| १. वारा आला व पाऊस गेला. | २. गोविंदाला बोलाव किंवा विठूला बोलाव. |
| ३. कोणी हत्तीवर बसून आले, व कोणी घोड्यावर बसून आले, आणि कोणी रथांत बसून आले. | ४. रामचंद्र गेला, आणि त्याबरोबर सीताही गेली. |

ह्या प्रत्येक ठिकाणींही किती वाक्यें आहेत बरें ? वरच्या विचारावरून आपल्यास कळून येईल कीं, येथेंही बोलणारास जें सांगावयाचे आहे, तें वरीलपैकीं नुसत्या एकट्या एकट्या वाक्यानेच पुरें होत नसून, त्या दोन किंवा तीन वाक्यांनीं म्हणजे त्यांच्या समुच्चयाने पुरे होत आहे. अर्थात् **पुऱ्या अर्थाचें जेवढें बोलणें** तेवढ्याला **वाक्य** म्हणावयाचें असल्यामुळें, वरील दोन किंवा तीन वाक्यें मिळून होणारें हें वरचें **एकेकच वाक्य** आहे; हें उघड झालें.

आतां "जो चोरी करितो, त्याला शिक्षा होते" ह्यासारखें वाक्य आणि दोन-तीन वाक्यांमिळून होणारे आतांचें वाक्य यांत फरक काय आहे ?

असें कळून येईल कीं, आपण आरंभीं विचार केलेल्या वाक्यांत एक **मुख्य वाक्य** व दुसरें त्याच्या पोटांतलें वाक्य, असें तें एकेक

वाक्य आहे; आणि आतांच्या एकेका वाक्यांत जीं वाक्यें आहेत तीं पोटांतलीं वाक्यें नसून, बोलणाराला त्या प्रत्येक वाक्यांतील गोष्ट प्रमुखत्वानें पण दोन्ही किंवा तिन्ही प्रमुख गोष्टींचा संग्रह करून एकत्रितपणानें सांगावयाची आहे. असें असल्यामुळें, हें खालचे जरी अनेक वाक्यांचें मिळून **एक वाक्य** असलें, तरी त्यांतील प्रत्येक **मुख्य वाक्य** आहे; व त्या दोन किंवा तीन मुख्य वाक्यांमिळून एकेक वाक्य झाले आहे. अशा प्रकारच्या वाक्यांत सर्वच मुख्य वाक्यें असतात; त्यांत एक मुख्य व बाकीचीं गौण असा प्रकार नसतो. अशा दोन किंवा तीन किंवा अनेक प्रमुख वाक्यांमिळून होणारें जें **एक** वाक्य त्याला "**संयुक्त वाक्य**" असे म्हणतात.

[ ३ ]

यारून वाक्य तीन प्रकारचें असतें, असें आपल्यास म्हणतां येईल. ( १ ) "वारा आला" याला आपण एकेरी किंवा **शुद्ध वाक्य** असें म्हणूं; याच्या पोटांत दुसरें वाक्य नाहीं. ( २ ) "वारा आला व पाऊस गेला" हें **संयुक्त वाक्य;** हें दोन मुख्य वाक्यांच्या संग्रहानें झालेलें आहे. आणि ( ३ ) "जेव्हां वारा येईल तेव्हां पाऊस जाईल" हें **मिश्र वाक्य;** यांत एक प्रमुख वाक्य व त्याच्या पोटांत दुसरे गौणवाक्य आहे.

[ यांच्या मिश्रणानें वाक्याचे अनेक प्रकार पडतील; पण त्यांचा विचार पुढें करूं. तूर्त एवढेंच ध्यानांत ठेवावयाचें कीं, ( १ ) जेव्हां वाक्यांत **एकच क्रियापद** असतें, तेव्हां तें "**शुद्ध वाक्य**" असतें; ( २ ) जेव्हां आणि, व

अथवा, किंवा, ह्या शब्दांनीं दोन अथवा अधिक वाक्यें जोडिलीं जातात, तेव्हां तें सर्व मिळून "**संयुक्त वाक्य**" होतें; आणि ( ३ ) जेव्हां जो–जी–जें हीं सर्वनामें; जेव्हां–जेथपासून–जेथपर्यंत इ० क्रियाविशेषणें; जसा–जेवढा–जितका–असा, इ० विशेषणें; कारण, म्हणून, इ० उभयान्वयी अव्ययें; अशा प्रकारच्या संबंधी शब्दांनीं आरंभ असलेल्या वाक्यावर दुसरें प्रमुख वाक्य अवलंबून असतें, तेव्हां तें पोटवाक्य व मुख्य वाक्य सर्व मिळून "**मिश्रवाक्य**" होतें.]

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्ये कोणत्या प्रकारची आहेत तें सांगाः—

( १ ) देशाची उन्नति त्यांतील रहिवाशावर अवलंबून असते. ( २ ) हिंदु लोकांस गणितासंबंधानें जो मान मिळतो, तो भास्कराचार्यामुळें होय. ( ३ ) जॉन्सन इतिहासास तुच्छ मानीत असे. ( ४ ) प्रधान इतकी फौज घेऊन का येतात, असें बोलले. ( ५ ) तुम्हीं बाजिरावाचे पुत्र आहात व बाळाजीपंतांचे नातू आहांत. ( ६ ) जे देशाच्या उन्नतीकरितां झटतात, ते देशाचे हितचिंतक होत. ( ७ ) मनुष्यांची जसजशी सुधारणा होत चालली, तसतसा विनिमयामध्यें फरक पडत चालला. ( ८ ) जर तुम्हांस कोणी दोन रुपये दिले, तर त्यास आपले कान कापून द्याल काय ? ( ९ ) पैसा द्यावा आणि जिन्नस विकत घ्यावा. ( १० ) त्याजवळ पैसा नाहीं, विद्या नाहीं, व रूपही नाही. ( ११ ) विद्या नाहीं, तो पशुतुल्य होय.

# २४. संयुक्तवाक्यपृथक्करण

शुद्ध वाक्याचें पृथक्करण कसें करावयाचें, हें आपल्यास मागेंच माहीत झाले आहे; त्याचप्रमाणें संयुक्त-वाक्य म्हणजेही दुसरे तिसरें कांहीं नसून, दोन किंवा अधिक मुख्य वाक्यें **आणि, व, अथवा, किंवा,** ह्या शब्दांच्या दुव्यांनीं एकमेकांस जोडिलीं जातात; हेंही आपल्यास माहीत आहे; अर्थात् दोन डब्यांच्या मधली साखळी किंवा दुव्वा किंवा कडी म्हणजे हाही डबा नव्हे, अगर तोही डबा नव्हे; डब्याच्या बाहेर साखळी किंवा दुव्वा असतो, डब्यांत तिचा कांहीं समावेश होऊं शकणार नाहीं; हें उघडच आहे त्याचप्रमाणे सयुक्त-वाक्यांमधील **आणि, व, अथवा, किंवा,** हे शब्द कोणत्याच वाक्यातले नसल्या-मुळें त्यांस वगळून, क्रमाने संयुक्त-वाक्यांतील प्रत्येक प्रमुख वाक्याचें निरनिराळें पृथक्करण केलें, म्हणजे झालें. आपण शुद्ध वाक्याचें पृथक्करण करण्याची रीत मागें ठरविलीच आहे. त्याप्रमाणेच संयुक्त-वाक्यातील प्रत्येक वाक्याचें पृथक्करण आपणांस करितां येईल. उदाहरणार्थः—

### वाक्यें

१. "परवां माझ्या मंडळींची चुकामूक पडली आणि मला रस्त्यांत चोरांनीं लुटलें."

**स्पष्टीकरण**—हें संयुक्त-वाक्य आहे; व त्यांतील दोन वाक्यें

‘आणि’ ह्या अव्ययानें जोडलीं गेलीं आहेत. त्यांतील दोन्ही वाक्ये मुख्य आहेत. त्यांचें पृथक्करण खालीलप्रमाणें:—

| वाक्यें | उद्देश्यांग | | विधेयाग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | विधेय-विस्तार | विधेयपूरक | मूल विधेय |
| (१) | माझ्या मंडळींची | चुकामूक | परवां | ... | पडली |
| (२) | ... | चोरांनी | रस्त्यांत | मला | लुटलें |

२. “तों एकाएकीं तें उदक आटूं लागले आणि नेत्रस्पर्शास टिपूसभर देखील पाणी उरलें नाहीं व मत्स्यादि जीवांनीं तळमळ करून पटापटां प्राण टाकिले.

**स्पष्टीकरण**—हें संयुक्त-वाक्य आहे; व यांत एकंदर तीन प्रमुख वाक्यें असून, पहिलीं दोन ‘आणि’ या शब्दाने व दुसरे व तिसरे ‘व’ ह्या शब्दाने जोडलें आहे. त्याचें स्पष्टीकरण खालीलप्रमाणें:—

| वाक्यें | उद्देश्याग | | विधेयाग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | विधेय-विस्तार | विधेयपूरक | मूल विधेय |
| (१) | तें | उदक | तों, एकाएकीं, | ... | आटूं लागले |
| (२) | ... | पाणी | नेत्रस्पर्शास, टिपूसभर देखील, | ... | उरलें नाही |
| (३) | मत्स्यादि | जीवांनी | तळमळ करून, पटापटां, | प्राण | टाकिले |

ह्याप्रमाणेंच अनेक प्रमुख वाक्यांमिळून जरी एक संयुक्त-वाक्य झालें असलें, तरी त्याचें वरीलप्रमाणेंच क्रमानें पृथक्करण करतां येईल.

मिश्रवाक्याच्या पृथक्करणाचा विचार पुढें करूं.

---

### प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यापैकीं एकेका **संयुक्तवाक्याचें** व्यवस्थितपणें पृथक्करण करून, घरून लिहून आणाः—

( १ ) शिवाजीचा मुलगा संभाजी हा शूर होता, व तो हेकेखोरही होता.

( २ ) संभाजीने आपल्या बापाच्या वेळच्या पुष्कळ सरदारांना ठार मारलें आणि आपल्या स्वच्छंदी वर्तनाने पुष्कळ मराठे लोकानाही आपले शत्रु बनविलें.

( ३ ) संभाजीचे मृत्यूमुळे मराठे लोकांना अवरंगजेबाचा फार राग आला व ते राजारामाच्या हाताखाली एकत्र झाले.

( ४ ) ते साळसूद दिसणारे गृहस्थ वेडे असावेत, किंवा त्यांनीं वेडेपणाचें सोंग घेतले असावें.

---

## २५. शब्दांचें व्याकरण सांगणें

वाक्यांतील शब्दांचें व्याकरण सांगण्याची पद्धति आपल्यास माहीत झाली आहे; आतां ज्या नवीन गोष्टींसंबंधानें आतांपर्यंत आपण विचार केला, तेवढ्याच गोष्टी ज्यांत येतील, अशा प्रकारच्या वाक्यांचें व शब्दांचें व्याकरण सांगूं.

**१. " आपलें सभ्यपणाचें वागणें असावें."**

**आपलें**—हें आपण या पुल्लिंगी प्रथम पुरुषवाचक सर्वनामाचें, षष्ठीचें एकवचन; षष्ठीचा अर्थ संबंध, वागणें ह्या शब्दाशीं.

**सभ्यपणाचें**—हें सभ्यपणा या भाववाचक नामाचें, पुल्लिंगी, षष्ठीचें एकवचन; षष्ठीचा अर्थ संबंध, वागणें ह्या शब्दाशीं.

**वागणें**—हें वागणें या धातुसाधित नामाचें, नपुंसकलिंगी प्रथमेचे एकवचन; प्रथमेचा अर्थ कर्ता, असावें ह्या क्रियापदाचा.

**असावें**—हें अस ह्या अकर्मक धातूचें, विध्यर्थी, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत वागणें हा कर्ता, असावें हें क्रियापद; हा **अकर्मककर्तरि** प्रयोग.

**२. आंधळयाला सारेच आंधळे वाटतात."**

**आंधळयाला**—हें आंधळा या विशेषणात्मक नामाचें, पुल्लिंगी, चतुर्थीचें एकवचन; चतुर्थीचा अर्थ अधिकरण.

**सारे**—हें सारा या विशेषणात्मक नामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें अनेक-वचन; प्रथमेचा अर्थ कर्ता, वाटतात ह्या क्रियापदाचा.

**च**—हें शुद्धशब्दयोगी अव्यय.

**३. " चावणाऱ्या कुत्र्याला मारण्यास कांहीं हरकत नाहीं."**

**चावणाऱ्या**—हें कुत्र्याला ह्या शब्दाचें विशेषण.